


# संपादक मंडळ

डॉ. शारदा वैद्य
डॉ. मंगल तिवारी
शलाका देशमुख
श्री. श्रीराम कोळी
श्री. विशाल शिंदे
श्री. भरत गोडांबे

# वृक्षसाक्षरता ई- दिवाळी अंक २०२३

# अंतरंग

# पहिल्या अंकाच्या निमित्ताने...

रानफुलांची नवरात्र या लेख मालिकेला भरभरून प्रतिसाद मिळाला आणि मग वृक्षसाक्षरता समूहचा ई- दिवाळी अंक काढावा असा बेत आखला. खरं दोन वर्ष आधीपासूनच हा विचार सुरू होता पण यावर्षी त्याला मूर्त स्वरूप आले. अगदी कमी दिवसात आपल्या मधल्या अनेक निसर्गप्रेमी मंडळींनी आपले लेख, कविता, रांगोळया या अंकासाठी प्रेमपूर्वक पाठवल्या आणि त्यातूनच वृक्षसाक्षरता समूहचा हा पहिला ई- दिवाळी अंक साकार झाला त्याबद्दल मी आपला ऋणी राहीन. संपादक मंडळाने देखील सर्व साहित्य तपासण्याचं काम वेळेत पूर्ण करून दिलं त्याबद्दल त्यांचे आभार. यातील अनेक प्रकाशचित्रे ही आंतरजालावरून घेण्यात आली आहेत.

या अंकात काय वाचायला मिळेल हे मी इथे सांगणार नाही. जैवविविधता हा विषय घेऊन अंक करावा असे योजले आणि त्या अनुषंगाने जे लेख प्राप्त झाले ते यात समाविष्ट केले गेले आहेत. अत्यंत मोठी व्याप्ती असणाऱ्या या विषयाच्या सर्वच अंगांना स्पर्श करता आला नाही परंतु जे जे साहित्य उपलब्ध झालं ते त्या त्या क्षेत्रातील अभ्यासू व्यक्तीने लिहिले हे मात्र खरं... यातील लेख वाचले की ते आपल्या लक्षात येईलच.

एक गोष्ट नम्रपूर्वक सांगतो की इतर दिवाळी अंकांप्रमाणे हा अंक नक्कीच नाही कारण कोणत्याही डीटीपी ऑपरेटर कडून याची बांधणी करून घेण्यात आली नाहीये. मला जसा वेळ मिळेल त्या पद्धतीने मी हे काम केलेले आहे त्यामुळे यात ऑफसेटचा साचेबंधपणा नाही त्याकडे कृपया दुर्लक्ष करावे ही विनंती. निसर्गाचा आनंद घेणाऱ्या प्रत्येकाने लिहिते व्हावे हाच केवळ एकमेव हेतू डोळयासमोर ठेवून या अंकाचे काम सुरू केलेले आहे. यावर्षी जसा प्रतिसाद मिळाला तसाच प्रतिसाद कायम मिळत राहील याच अपेक्षेसह हा अंक आपल्यापुढे सादर करीत आहे.

लोभ आहेच तो वृद्धिंगत व्हावा ही विनंती!

**आपला**

**सृष्टीमित्र भरत गोडांबे**

**निसर्गशिक्षक**

**१५ ऑक्टोबर २०२३**

# ऋतुरंग

जागतिक तापमानवाढीमुळे वर्षागणिक आक्रसत जाणाऱ्या थंडीच्या व वाढत जाणाऱ्या उन्हाळयाच्या कालखंडांमुळे हल्ली मार्चच्या सुरवातीपासूनच काहिली होऊ लागते. त्यामुळे हल्लीच्या पिढीला तीस चाळीस वर्षांपूर्वी बऱ्यापैकी थंडीतील दिवाळी व होळी हे बहुदा मान्यच होणार नाही. तरीही वर्षगणिक लवकर लवकरच येणाऱ्या उन्हाळयाची चाहूल आपल्याला वसंत ऋतूतील मनमोहक रंगांमुळे काही वेळा पुरती का होईना सुखद वाटते. उष्ण कटिबंधातील मोसमी हवामानाच्या प्रदेशातील आपला भारत देश असो वा समशीतोष्ण / शीत कटीबंधातील अमेरिका जपान असो. अशा वेगवेगळया हवामानाच्या प्रदेशात दर बदलणाऱ्या ऋतुगणिक वेगवेगळया रंगांची मुक्तहस्ते उधळण करणाऱ्या निसर्गाची ही विविध रूपे

शिशिरात पानगळीमुळे निष्पर्ण झालेले पळस, काटेसावर, पांगारा या सारखे वृक्ष वसंतात फुलापानांचे असे मोहक रंग धारण करून रंगपंचमी साजरी करतात.







मग तो भगवा पळस वा गुलाबी काटेसावर असो, सोनमोहोराचा पिवळाधम्मक गालीचा वा बहाव्याचा बहर असो, कुसुम्बाची केशरी धम्मक व करंजाची पोपटीशार पाने संपूर्ण आसमंत रंगवून सोडतात.







साधारण याच सुमारास समशितोष्ण कटिबंधातले जपान सारखे देश गुलाबी रंगाच्या अनेक छटात चेरी ब्लॉसम ने (साकुरा व ट्युलिपच्या विविध रंगात अक्षरशः न्हाऊन निघतात, आपल्या सिक्कीम मधील तिस्ता नदीचे खोरे ऱ्होडोडेंड्रॉन फुलांनी सजते.






ग्रीष्माच्या उन्हात होरपळून निघालेली वर्षाऋतूची चातकासारखी वाट पाहणारी धरणी पावसाच्या थेंबांनी मातीला व वृक्षांना नववधूगत हिरवा साज चढवते. डोंगरदऱ्या, पठारे, शेते एकाच हिरव्या रंगाच्या अनेक छटा धारण करतात. मोसमी पाऊस हा जगातील मोजक्याच प्रदेशात (मुख्यतः भारतीय उपखंड आग्नेय आशिया, मध्य अमेरिका) पडत असल्यामुळे उर्वरित प्रदेशात पावसाळा असा वेगळा ऋतू नाही. त्यामुळे वर्षाऋतूतील रंगबदल इतर ठिकाणी प्रामुख्याने जाणवत नाहीत..




पावसाळा संपत आला असता शरद ऋतू आपले कासचे पठार अशा मनमोहक छटांनी सजवतो की मन अगदी मोहरून जाते.




ह्याच सुमारास सह्याद्री आपल्या अंगावर सोनकीची पिवळीधम्मक शाल पांघरतो.



आपल्याकडील हेमंत ऋतू धरेचे हिरवे पांघरूण काढून घेत असताना शीत कटिबंधांतील देशात मात्र शिशिरातील पानगळीच्या आधी तेथील वृक्षांना सुंदर अशा पिवळया, लाल, केशरी अशा रंगांनी (फॉल कलर्स) न्हाऊ माखू घालतो.




शिशिरात पानगळीत वृक्ष पूर्णतः निष्पर्ण होऊन वसंत ऋतूची वाट पाहू लागतात आणि ऋतुरंगाच्या चक्राची एक गिरकी पूर्ण होते.

तथाकथित विकासाच्या हव्यासापोटी नैसर्गिक स्त्रोतांची व सृष्टीची होत असणारी अविरत हानी मानवास आत्मनाशाकडे नेण्यास कारणीभूत ठरली तर आश्चर्य वाटावयास नको. तरीही पाच मूलतत्व आणि ११८ मूलद्रव्यांपासून निर्माण झालेल्या ह्या सृष्टीच्या ऋतुचक्रात हस्तक्षेप करणे अजून मानवास जमले नाही हे सुदैवच.

**अभिजित भिडे**
**abhijit2405@gmail.com**



# वेल

मानवी सभ्यतेच्या प्रारंभापासून मानवाला वेलींनी भुरळ घातली आहे, खाद्य, औषध, फुले, सुगंध, फायबर, सौदर्यांसाठी वेली लावल्या जात असत. वेलीशिवाय कोणत्याही बागेची कल्पना करणे अवघड आहे.

वेल म्हणजे स्वतः च्या मुळाखोडावर ताठ उभे राहून न शकणाऱ्या वनस्पती. वेलीचे खोड दुर्बल असल्याने त्यांना आधाराची गरज असते जगण्यासाठी टिकण्यासाठी सूर्यप्रकाश व अवकाश मिळवण्याच्या स्पर्धेत तींमध्ये आधारासाठी वेगवेगळे अवयव (काटे, हूक, तणावे) विकसित झाले. वेगवेगळया सक्रीय (Active) वा निष्क्रिय (Passive) पद्धतीचा वापर करून वेली आधाराने वाढतात. काही वेल खोडाफाद्यांनीच विळखे घालत आधारावर चढून वाढतात. त्यांना इंग्रजीत Twiner म्हणतात (उदा. गोकर्ण) कृष्णकमळ काकडी इ. वेल तणाव्यांच्या (Tendrils) आधाराने चढतात. नखे व हूकच्या आकाराचे काटे ह्यांच्या आधाराने बोगनवेल, वेलीगुलाब वाढतात. काही वेली adhesive pads व आधार मुळांच्या मदतीने आधाराला चिकटतात आणि वाढतात उदा. मनीप्लांट, काही वेलींच्या फांदया वाकून आधारावर पसरतात त्यांना इंग्रजीमध्ये 'stragglers' म्हणतात. उदा हिरवा चाफा





आकर्षक रंग, पानाफुलांची वैशिष्ट्यपूर्ण रचना, आकार, सुवास ह्या गुणांमुळे छोट्याशा जागेत व लँडस्केपिंगमध्ये सौंदर्य, रंग भरतात. फुलपाखरे पक्षी आदीना आकर्षित करतात.

शहरात जागा आक्रसत जात असल्याने वृक्षलागवड करणे कठीण आहे पण लहानशा जागेत वेली सहज वाढवता येतात. वेली उभ्या. वाढत असल्याने त्यांना मोकळी (Ground space) जागा कमी लागते. योग्य वेल, योग्य (trelis) जाळी वापरून कुंडीमध्ये वाढवता येते trellis च्या आधाराने वेल वाढवून हिरव्या जिवंत भिंती बनवून प्रायव्हसी जपता येईल. बागेमध्ये जिवंत भिंतींचा वापर करून वेगवेगळे विभाग करता येतील.





Moss स्टीकवर पानवेल, Money Plant (Pothos), *Monstera adansanil*, *Philedendron*, इत्यादी सावलीत वाढणा-या पर्णशोभिवंत वेली वाढवता येतात अंतर्गत घरसजावटीसाठी हा उत्तम पर्याय आहे.

बास्केटमध्ये *Thunbergia fragrans*. *Thunbergia alata* लावून बाल्कनी शोभिवंत करता येईल.
योग्य वेली लावून Vertical space कल्पकतेने चा वापर करून Vertical garden करता येईल.






[For a trellis that is mobile, consider this garden bed and trellis combo project. The garden bed is on Casters, so it could be moved to different areas of your patio as the sunlight moves. The built-in trellis allows you to grow a climbing plant in the garden bed, which adds an interesting focal point to your garden. ]
दरवाजाच्या कमानीवर, कुंपणावर, पार्किंगच्या भिंतीवर, छपरावर वेली वाढवल्या तर एकसुरीपणा टळून सुंदरतेत भर पडेल, गारवा, सावली लाभेल शिवाय घरापाशी फुलपाखरे, पक्षी बागडतील.
मॉर्निंग ग्लोरीसारख्या काही वेली 'वर्षायु' तर बोगनवेल, वेलीगुलाब सारख्या वेली 'बहुवर्षायु' असतात. मोठ्या वाढणान्या काष्ठरूप मुख्य खोड, कठीण, लाकडी असणाऱ्या वेलांना "महावेल"(Liana) म्हणतात. उदा. गारंबीचा वेल काही वेलींना भरपूर सूर्यप्रकाश मानवतो

(संक्रांतवेल), पर्णशोभिवंत वेली सावलीत वाढतात (मनीप्लांट, होया) काही वेली आंशिक सावलीत छान वाढतात (ब्लीडिंग हार्टव्हाईन)

सुंदर फुले येणाऱ्या काही वेलीची तोंडओळख:

१) संक्रांतवेल : शास्त्रीय नाव: *Pyrostegia Venusta*

संक्रातीच्या दरम्यान फुलायला सुरुवात होते, म्हणून 'संकातवेल' हे नाव दिलेय. फुलांचा रंग तेजस्वी नारिंगी, फुलांचे घोस तजेलदार दिसतात.

फुलांचा हंगाम: जानेवारी-मार्च अखेर अभिवृद्धी छाटकलम, दाबकलम.

२) आईसक्रीम क्रीपर: शास्त्रीय नाव: *Antiganon leptopus*

फुलांचा रंग स्ट्रॉबेरी आइसक्रीमच्या रंगासारखा. भरभर वाढणारा, बराच मोठा होणारा वेल कुंपणावर, भिंतीवर, कमानीवर लावण्यासाठी योग्य आईसक्रीम क्रीपरच्या दोन उपजाती आहेत. एक पांढरीशुभ्र फुलांची, दुसरी लालभडक फुलांची

फुलांचा रंग आकर्षक, तजेलदार गुलाबी असतो. फुलांचे तुरे फांदयांच्या टोकांना आणि पानांच्या बगलेत येतात

फुलांचा हंगाम: पावसाळयात हिवाळयाच्या सुरुवातीपर्यंत. अभिवृद्धी: छाटकलम, दाबकलम

३) स्कायब्ल्यू क्लस्टर व्हाइन : शास्त्रीय नाव: *Jacquemontia pentantha*.

नाजूक, आकर्षक आकाशी रंगांचे फुलोरे येणारा सुंदर वेल. लहानखुरा वेल, पानझडी असल्यामुळे उन्हाळयात त्यांची पानगळ होऊन नवीन पालवी येते. खोड व फांदया बारीक असून गुंडाळत आधारावर चढतात. आकर्षक आकाशी रंगांच्या फुलांचे गुच्छासारखे दिसणारे फुलोरे येतात, म्हणून स्काय ब्लू क्लस्टर व्हाइन नाव पडले आहे. कमानींवर, कुंपणावर लावण्यासाठी योग्य. बियांपासून रोपे सहज तयार होतात.

फुलांचा हंगाम ऑक्टोबर नोव्हेंबर

४) ग्लोरी व्हाइन : शास्त्रीय नाव: *Clerodendrum splendens*

खूप मोठा वाढणारा सदाहरित महावेल. फुले सुंदर, आकर्षक फुलांचे लोंबणारे फुलोरे ५ ते १५ से मी लांबीचे असतात. खोड काष्ठरूप असते.

फांदया उंच चढतात किंवा लांबवर पसरतात.

फुलांचा हंगाम सप्टेंबर ऑक्टोबर,

५) वाघळी : शास्त्रीय नाव: *Thunbergia mysorensis*

हा भरभरून फुललेला वेल मी कोपरकर नर्सरी, गव्हे, दापोली येथे पहिल्यांदाच पाहिला. ओबेलिस्कवर चढलेला, चकचकीत हिरव्यागार पानांचा अप्रतिम सुंदर, आकर्षक लाल, नारिंगी, पिवळ्या रंगसंगतीच्या फुलांचे लोंबणारे फुलोरे मिरवणारा अप्रतिम सुंदर वेल नेत्रसुखद होता. बहुवर्षायु, देशी वृक्ष आहे. कमानींवर, कुंपणावर लावण्यासाठी योग्य

फुलांचा हंगाम डिसेंबर - जानेवारी अभिवृद्धि छाट कलमांद्वारे करतात. (*Thunbergia mysorensis* )



भिरभिर्याचा वेल (*Petrea Volubilis*) - गणेशवेल (*Ipomoea quamoclit* ), गारवेल (*Ipomoea cairica*) गोकर्ण ( (*Clitoria ternatea*) चिमिनी (*Thunbergia fragrans*) जहरी सोनटक्का ( *Allamanda cathartica*) या आकर्षक फुले येणाऱ्या वेली लावता येतील. जाई, जुई, सायली, कुंद, चमेली सुवासिक फुलांसाठी प्रसिद्ध आहेत.

कारले, दोडका, दुधी भोपळा, पडवळ, काकडी, तांबडा भोपळा, रताळे या वेलभाज्या लावता येतील.

अबई (*Canavalia ensiformis*) चा वेल मोठ्या कुंडीत छान वाढतो. अबईचा वेल दोन-तीन वर्षे जगणारा, खोडाफांद्यांनी आधारावर गुंडाळत वर चढून पसरणारा आहे. फुलांचा हंगाम पावसाळ्यात असतो. शेंगा पावसाळा हिवाळ्यात लागतात. अबईच्या कोवळ्या वा मध्यम कच्च्या शेंगांची भाजी करतात. वाळलेल्या बिया उसळी साठी वापरतात. प्रथिनयुक्त पौष्टिक भाजी.

अभिवृद्धिः बियांद्वारे,



शतावरी, गुळवेल, हाडजोड, विधारा ह्या औषधी वेलीसुद्धा छान वाढतात.

काही वेली फार झपाटयाने वाढतात. त्यांना योग्य आधार देण्याची आवश्यकता असते. त्यांचा आकार योग्य, मर्यादित ठेवण्यासाठी छाटणी करणे गरजेचे असते.

आपणास कोणत्या हेतूने वेल लावायची आहे. याचा विचार करून वेलींची निवड करावी. फुलांचा रंग, फुलण्याचा हंगाम, त्यांचा आकार, एकेकटी की गुच्छाने येणारी आदी बाबींचा विचार करून वेली लावल्या तर वर्षभर बाग फुलत राहील.

**डॉ. मंगल तिवारी**

**mangal.panchkarma@gmail.com**



# परसदारातील पाहूणे

निसर्गाचं आकर्षण सर्वांनाच असतं. सिमेंट कॉंक्रिटच्या जंगलात राहणारा आमच्या सारखा शहरी माणूस निसर्गासोबत क्षण घालवण्यासाठी अगदी धडपडत असतो, असेच अद्भुत क्षण शोधण्याच्या प्रेरणेतून काही महिन्यापूर्वी आमची एक कौटुंबिक सहल ठरली. पुण्या-मुंबईच्या मंडळींना सोयीचं जावं म्हणून खंडाळयाला भेटायचं ठरलं. पावसाळी थंड वातावरण, दाट धुके आणि रिमझिम पाऊस अशा प्रसन्न वातावरणात रात्री छान गप्पा रंगल्या आणि मग निजानीज झाली. पहाटे पावणे पाचच्या सुमारास मला जाग आली आणि "आयला! मलबार विसलिंग प्रश!" असं म्हणून मी चटकन उठून बसलो. बाकी मंडळी झोपलेली होती. मी दरवाजा उघडून रस्त्यावर आलो आणि जणू गाण्याच्या मैफलीत आल्यासारखं वाटलं. शिळकर कस्तूर असं या पक्ष्याचं सार्थ नाव गर्द निळा, साधारण साळुंकीच्या आकाराएवढा हा पक्षी, समोरच्या झाडावर निवांत पणे बसून जणू एखादा गायक अहिर भैरवचा रियाज करत असावा, तस तो मोठ मोठया ताना घेत होता. पक्षीतज्ञ डॉ सालिम अलींनी याला "व्हिसलिंग स्कूलबॉय" असं म्हटलंय. जणू एखादा शाळकरी मुलगा आपल्याच नादात शीळ घालत जातोय असं सार्थ वर्णन केलंय. आता हे आवाज चोहोबाजूने येऊ लागले. बरेच नर पक्षी गात होते. पश्चिम घाटातली ही सुंदर दरी नर कस्तुरांच्या तानांनी नादमय होऊन गेली गायकाला एखाद्या स्पर्धेतील समीक्षकांना प्रभावीत करायचं असतं तसं या नरांना मादीला आकर्षित करण्यासाठी कसून गावं लागतं. सुश्राव्य मादी सुदृढ नराचा निकष या त्याच्या गाण्यातून लावते असं म्हणतात आणि असा नर तिच्या पसंदीला उतरला तर ती मिलनासाठी होकार देते. विणीच्या हंगामात हा असा पक्ष्यांचा संगीतमय वधू-वर सूचक मेळावा अनुभवावा तेवढा थोडाच !



अशा अनुभवांना वातावरणाला आपण शहरातली लोकं का बरं मुकतो ? असा प्रश्न पडतो. खरं तर एवढी प्रचंड जिविधतेचा वारसा मिळालेला आपला देश ! शहरातून मात्र जैवविविधता झपाट्याने लुप्त होत चालली आहे, ही चिंतेची बाब आहे. अधिवास नष्ट होणे हे एक अर्थातच प्रमुख कारण! सदनिका विकत घेताना "निसर्गरम्य वातावरणात!" अशा जाहिरातींना आम्ही आकर्षित होतो पण वास्तव दुर्दैवाने काही वेगळेच असतं. आमची खिडकी उघडली की आम्हाला हिरवंगार दिसावं अशी अपेक्षा असते आणि बिल्डिंग कंत्राटदार अशा प्रकारे पटकन वाढणारी बहुतांशी परदेशी झाडे लावतात. स्थानिक पक्षी, फुलपाखरे, इतर कीटक यांच्यासाठी ती अनोळखी असतात. थोडक्यात हे हिरवे वाळवंटच असतं असं म्हणाना! शहरा जवळील अधिवासातील परिसंस्था, आपल्याला स्वच्छ हवा आणि पाणी, पाऊस, मानसिक आनंद अशा वेगवेगळ्या तऱ्हेने सेवा देत असतात. आपल्या आजूबाजूच्या परिसंस्थाचा दर्जा जेवढा चांगला तेवढ्या ह्या सेवा आपल्याला चांगल्या तर्हेने मिळतात आणि परिणामी शहराचे आपले आणि आपल्या कुटुंबाचे शारीरिक आणि मानसिक स्वास्थ्य चांगले राहण्यास मदत होते.





फुलपाखरे, पक्षी, कीटक इत्यादी हे चांगल्या परिसंस्थांचे निर्देशक आहेत. मुंबईत सुमारे दीडशे प्रजातीच्या फुलपाखरांची नोंद होती. घुबड, गिधाडं, धनेश यासारखे अनेक पक्षी आणि अनेक प्रकारची फुलपाखरे अधिवास नष्ट झाल्याने शहरातून आता हद्दपार झाले आहेत आणि उरल्या सुरल्या जंगलातून आपलं अस्तित्व टिकवायचा प्रयत्न करत आहेत. आपण आपल्या घरातील बाल्कनीमध्ये किंवा सोसायटीच्या आवारात फुलपाखरू उद्यान बनवून आपला खारीचा वाटा

सहज उचलू शकतो. अशा बागांतून हळूहळू स्थानिक फुलपाखरांची आणि पक्ष्यांची वर्दळ वाढते. मुलांसाठी आणि मोठ्यांसाठी पक्षी निरीक्षण फुलपाखरू निरीक्षण ही मनाचा ताण घालवण्यासाठी पर्वणी ठरू शकते. आपण अशा प्रकारे लहान स्वरूपात अधिवास निर्माण करून उपलब्ध जागेचा योग्य वापर करू शकतो ही जमेची बाजू. कदंब, वड, पिपळ, उंबर, बहावा, पाटल, आंबा, काटेसावर असे अनेक स्थानिक वृक्ष लावू शकतो. या झाडांवर तांबट, पोपट, मैना, कावळे, चिमण्या, हळद्या, सूर्यपक्षी, रॉबिन, असे अनेक प्रकारचे पक्षी भेट देऊन जातात.

फुलपाखरू उद्यानासाठी दोन प्रकारची झाडे लावता येतात. एक म्हणजे ज्यावर फुलपाखरे अंडी घालतात त्यांना खाद्य वनस्पती (होस्ट प्लांट) म्हणतात. पानफुटी, लिंबू, बेल, कृष्णकमळ, कडीपत्ता, खोटा अशोक इत्यादी अनेक प्रकारची झाडांवर विशिष्ट प्रकारची फुलपाखरे अंडी घालतात. प्रत्येक प्रजातीच्या फुलपाखरांची विशिष्ट खाद्य वनस्पती आहे. त्याच (किंवा त्याच कुटुंबातील) झाडांवर ते फुलपाखरू अंडी घालते. कडिपत्त्यावर कॉमन मॉर्मन, लिंबावर लाईम (लिंबाळी), पानफुटीवर रेड पीएरो ही काही उदाहरणे देता येतील. अंड्यातून अळी बाहेर येते व पाने खाऊन वाढते. मोठी झाली कि अळी कोशात जाते आणि अळीत संपूर्ण बदल होऊन तिचं फुलपाखरू तयार होते. ते कोषातून बाहेर येते, आपले पंख वाळवते आणि मुक्त भरारी घेते. हे जीवनचक्र घर बसल्या पहाणे म्हणजे विशेष करून मुलांना स्वर्गीय आनंद देऊन जाते. त्यांच्यात निरीक्षणाची कुशलता वाढवणारा आणि मनावरचा ताण कमी करणारा हा छंद आहे.





दुसऱ्या प्रकारच्या वनस्पती म्हणजे फुलपाखरांना रसपान (नेक्टर प्लांट) करण्यासाठी लावू शकतो. तेरडा जाई, जुई गोकर्ण, जमैकन ब्लू स्पाईक, हळदी कुंकू इत्यादी अनेक फुलझाडे लावू शकतो. काही फुलपाखरे सडलेल्या फळांवर रसपान करतात. एका परडीत जास्त पिकलेली केळी, चिकू, डाळिंब अशी फळे ठेवली. वेगळ्या प्रकारची फुलपाखरे आपल्या उद्यानाला भेट देतात. याच बरोबर सूर्यपक्षी, बुलबुल, चिमण्या इत्यादी पक्षीही आपल्या घरच्या किंवा सोसायटीच्या उद्यानात फेरफटका मारताना नक्कीच दिसतात.



फुलपाखरे आणि पक्षी स्नेही आवार बनवणे हा नक्कीच एक आनंददायी अनुभव आहे. सद्य परिस्थतीत निसर्ग संवर्धनात अशा प्रकारे सहभागी होणे शक्य आहे. एक सुजाण नागरिक म्हणून आपल्या सभोवतीच्या अधिवास संवर्धनाचे महत्व आणि प्रक्रिया नीट जाणून घेऊन, शक्य तो हातभार लावण्याचा प्रयत्न आपण करू शकतो. रस्याच्या कडेला, सार्वजनिक बागांमधून स्थानिक झाड, फुलपाखर आणि पक्षी ही झाडं लावण्याची सुरवात आपण स्थानिक नगरसेवक यांच्या मार्फत केली तर मोठा व चांगला बदल होण्यास मदत होऊ शकते. याचा सर्वार्थानी फायदा नागरिकांना  तसेच त्यांच्या पुढच्या पिढयांना होईल हे निश्चित आणि हे अगदी सहज करता येण्यासारखे आहे.

**समीर गुळवणे**

**samirgulavane@gmail.com**



# एक छोटासा बदल... Project BMS

आपल्या भोवती असलेल्या वृक्षराजीपासून आपल्याला श्वसनासाठी आवश्यक प्राणवायू मिळतो परंतु त्याच वृक्षांची पानगळती शहरवासियांना एक डोकेदुखी होते. रस्तावरील पालापाचोळा तर महानगरपालिका सफाई कर्मचाऱ्यांमार्फत गोळा करते पण आपल्या गृहनिर्माण संस्थेतील पालापाचोळा गोळा करून त्याची विल्हेवाट लावणे ही खर्चिक व डोकेदुखीची गोष्ट असते.

या पालापाचोळयाला आपण जर का संपदा म्हटले तर.....



असे बोलण्याने नाही तर करण्यानेच ही संपदा आहे हे सिद्ध करावे लागेल. निसर्गाच्या अन्नसाखळीचा भाग म्हणून आपण जंगलात पडणाऱ्या पालापाचोळयाचा अभ्यास केला तर असे लक्षात येते की पानगळ झाली की ती पाने खाली पडतात. जंगलातील प्राणी पक्षी व कीटक यांच्या मलमूत्राद्वारे विविध सूक्ष्मजीवाणू या पानांचे विघटन करून त्यांची पोषकमूल्य असलेली माती तयार करतात. हे मातीतील अन्नघटक परत या झाडांच्या मुळांद्वारे ग्रहण केले जातात व पानांची व झाडांच्या इतर अवयवांची वाढ होते. हीच पाने त्यांचे प्रकाश संश्लेषणाचे काम पूर्ण करून पुन्हा गळण्यास तयार असतात. हेच अविरत चक्र जंगलातील माती निर्माण करण्यास कारणीभूत असते. हा सिद्धांत शहरातील पालापाचोळयाच्या बाबतीत वापरल्यास त्याची अन्नघटकांनी परिपूर्ण अशी माती तयार करण्याचा विचार मनात आला. यात पद्मश्री डॉक्टर

सुभाष पाळेकर कृषी पद्धतीतील आच्छादन या तत्त्वाशी सांगड घालून प्रयोग करण्यास सुरुवात केली.

प्रोजेक्ट BMS म्हणजे Bag, Mulch, Seeds

Bag म्हणजे रोप लावण्यासाठी कुंडी

Mulch म्हणजे पालापाचोळा

Seeds म्हणजे बीज

झिरो बजेट प्रोजेक्ट म्हणून दुधाच्या एक लिटरच्या रिकाम्या पिशव्या वापरण्यासाठी घ्यायच्या त्यांना खाली चार छिद्र पाडायची. शक्यतो पेपर पंच मशीन वापरायचे. पालापाचोळा हाताने चुरगळायचा किंवा मिक्सरद्वारे अथवा प्रोफेशनल श्रेडरद्वारे भुगा (जवळ जवळ पावडर अथवा तंबाखू एवढा) करायचा. त्यात ३ ते ४ आठवडे पाणी घालायचे, जेणेकरून श्रेडेड मटेरियलचा माती सम लगदा तयार होतो. यात पुढील प्रमाणे बीजरोपण करायचे. शक्यतो सुरुवातीला शालेय विद्यार्थ्यांसाठी खाद्य प्रकारच्या बिया निवडाव्या.



MMC (मूग, मटकी, चवळी) MMC (मेथी, मोहरी, कोरियांडर) या बिया प्रत्येकी दोन अशा एका पिशवीत लावायच्या. प्रत्येक पिशवीवर बियांचे नाव आणि लावल्याची तारीख लिहायची

या अवस्थेला आपण विद्यार्थ्यांना शेतकरी ही पदवी प्रदान करतो. बीजरोपण झाल्यानंतर प्रत्येक दिवशी पाव ते अर्धा कप पाणी पिशव्यांमध्ये टाकायचे. तापमानानुसार दिवसातून एकदा अथवा दोनदा पावसाळयात गरजेनुसार एक दिवस आड पाणी द्यावे.

यानंतर विद्यार्थ्यांनी सर्व वाढींच्या नोंदी ठेवाव्यात. पानाच्या आकाराचे चित्र देखील नोंदवहीत काढावे. याने विद्यार्थ्यांमध्ये अभ्यासू वृत्ती निर्माण व्हायला वाव मिळतो. ही प्रक्रिया साधारण दोन ते तीन महिने चालू ठेवावी. या काळात फुले, फळे, शेंगा लागतात व त्याचा आनंद व आस्वाद सर्वांनी घ्यावा तीन महिन्यानंतर विद्याथ्यानी नवनिर्मितीसाठी कल्पकता दाखवावी. पिशव्यांच्या ऐवजी विविध आकाराचे डबे (दूध, दही श्रीखंड, बाहेरून मागवलेल्या अन्न पदार्थाचे) वापरावेत. जुने कपडे विशेषतः जीन्स वैगरे शिवून त्यात पण बीजरोपण करता येईल. या विषयात विद्यार्थ्यांना रंगत आली की विविध प्रकारच्या पालेभाज्या, वेलवर्गीय भाज्या, फळभाज्या याचं बीज रोपण करावं.

या प्रयोगात पालकांनी देखील सहभागी कावे ही अपेक्षा विद्यार्थी, आई व बाबा अशा प्रत्येकी सहा पिशव्या आपल्या खिडकीत तर सहज ठेवल्या जाऊ शकतात. आणि मग त्या साडीच्या जाहिरातीप्रमाणे तुमच्या झाडांपेक्षा माझ्या झाडाची किती छान वाढ. अशी एक सुदृढ स्पर्धा व चर्चा घडून कुटुबात या प्रयोगाद्वारे सुसंवाद घडू शकतो.

ज्या विद्यार्थ्यांनी या प्रयोगात अधिक रुची दाखवली त्यांना पदमश्री डॉ. सुभाष पाळेकर कृषी पद्धतीत "अवलंबलेली महत्त्वाची अंगे बीजामृत, जीवामृत, घनजीवामृत, आच्छादन, वापसा, पीक संरक्षणासाठी निमास्त्र, ताक देखील याचे विद्यार्थ्यांना ज्ञान दिले जावे.

कोविड काळामुळे हाताला चिकटलेला मोबाइल दूर करण्यासाठी या प्रयोगाचा अत्यंत परिणामकारक उपयोग दिसू शकतो.

CRD या प्रयोगातून विध्यार्थ्यांना काय मिळते ?

C: Connect With Nature

R: Respect For Food

D: Dignity For The Farming Profession

या प्रयासासाठी विशेष आभार
१. श्री अप्पासाहेब देसाई सचिव वसंतदादा पाटील प्रतिष्ठान सायन,
२. श्रीमती अर्णवाझ भगत मुख्याध्यापिका पार्ले टिळक विद्यालय ICSE पार्ले,
३. श्रीमती सपना यादव सपना मुख्याध्यापिका MPS IGCSE माटुंगा,
४. श्रीमती वंदना तिवारी मुख्याध्यापिका MPS CBSE जोगेश्वरी,
५. श्री भगवान भुसारे मुख्याध्यापक MPS SSC वडाळा,
६. श्रीमती शलाका देशमुख विश्वस्त दि शिक्षण मंडळ, गोरेगाव,
७. श्रीमती साक्षी कामठेकर शिक्षिका MPS पार्ले (MPS मुंबई महानगर पालिका संचालित शाळा)

वरील पैकी काही शाळांमध्ये विविध निविष्ठांची उपलब्धता CSR च्या माध्यमातून करून या प्रकल्पाला एक व्यावसायिक रूप देऊन शाश्वत स्वरूप दिल्याबद्दल Future Recycle Foundation च्या संस्थापिका श्रीमती राजराजेश्वरी यांचे विशेष आभार
सर्वांचे या प्रयत्नास यशश्वी करण्यासाठी लागलेल्या हातभाराबद्दल मनःपूर्वक धन्यवाद

प्रारंभापासून ते यश मिळेपर्यंत या प्रयोगांना मनस्वी प्रतिसाद देणाऱ्या सौ. विद्या तुषार देसाई यांनी केलेली मेहनत याबद्दल त्यांना आदरपूर्वक प्रेम

अशा प्रकारे पालापाचोळा (कचरा) ते संपदा (Resource) असा प्रवास होऊन अत्यंत दमदार सुरुवात झाली आहे. या लेखाच्या माध्यमातून अनेक जणांपर्यंत हा अभिनव प्रयोग पोहचवणे हा उद्देश.

**तुषार देसाई**
**bensonindia@gmail.com**



# वाळलेल्या पानांची माती होताना....

गोरेगावची डोसीबाई जीजीभॉय प्राथमिक शाळा ही आमची मराठी माध्यमाची प्रयोगशील शाळा. आमच्या शाळेतील इयत्ता तिसरी आणि चौथीचे विद्यार्थी यावर्षी तुषार देसाई यांच्या मार्गदर्शनाखाली एक प्रयोग करून पाहत आहेत. वाळलेल्या पालापाचोळयापासून माती तयार करणे, असा हा प्रयोग. जून महिन्यापासूनच आम्ही या प्रयोगाला सुरुवात केली. या प्रयोगासाठी लागणाऱ्या सर्व साहित्याची जमवाजमव मुलेच करत असतात. जसे की, वाळलेली पाने गोळा करणे, दुधाच्या पिशव्या, कडधान्ये आणणे, साधारणपणे ४ महिने हा प्रयोग चालू आहे. यात मुले नियमित नोंदी करत आहेत. पानांमध्ये होणारा बदल, रोपांची उंची मोजणे, कडधान्ये पेरूनही रोपं का आली नाहीत? यावर वर्गात चर्चा करत आहेत. या कृतीविषयी मुलांनी आपापले अनुभव लिहिले आहेत. त्यांचे एकत्रिकरण केलेला हे लेखन. यातील मुलांचे शब्द, भावना, विचार यात कोणताही बदल केलेला नाही.

रिद्धीने तिच्या अनुभवात लिहिलेय, आम्हाला सुट्टीवरून आल्यावर तुषारकाकांनी एक कल्पना दिली की, आपण पालापाचोळयाची माती करायची. पण माती कशी करायची बरं? माझ्या मनात हा प्रश्न आला. पण या तुषारकाकांनी पालापाचोळयाची माती करून पाहिली होती. त्यात त्यांनी धान्य पण पेरलं होतं. मग त्यांच्या कल्पनेनुसार आम्ही पालापाचोळा गोळा केला. शाळेत आल्यावर त्यातील काही पाने मिक्सरवर काही हाताने, तर काही कात्रीने बारीक केली. आम्ही प्रत्येकाने दुधाच्या पिशव्यांना भोक केली आणि त्यात बारीक बारीक पालापाचोळा भरला. आमच्या प्रत्येकाची एक अशा ८८ पिशव्या तयार झाल्या. आमच्या या प्रोजेक्टचं नाव आहे ग्रीन्स. मनस्वीने सांगितलं, आम्ही मिक्सरवर बारीक केलेला पालापाचोळा एका मोठ्या टायरमध्ये भरला. दोन्हीकडे आम्ही दररोज थोडं थोडं पाणी टाकलं.. असेच काही दिवस गेले. आम्ही त्याचं निरीक्षण पण लिहीत होतो. मग मला प्रश्न पडला की, अजून माती कशी बनत नाही? मग विचार आला की, पान अजून बारीक करूया. मी पुन्हा पान बारीक करायला घेतली. हे करत असताना मी पानांना हात लावायचे तेव्हा ती गुळगुळीत लागायची. पण पानांचा रंग फार बदलत नव्हता.

मग आम्ही त्यात जीवामृत घालून पाहिलं. जीवामृत पाण्यात मिक्स करून घालायच असतं.. तीन आठवड्यानंतर पानांचा रंग बदलला होता. पण थोडी थोडी चिकट वाटत होती. मग एक महिन्यानंतर पान खाली ओली झाली होती. थोडे दिवस वाट पाहिली. पण आपल्या रोजच्या मातीसारखी माती तयार होत नव्हती. मग आम्ही त्या पिशवीत पुन्हा जीवामृत टाकले. तरी त्या पिशव्यांमध्ये माती होताना दिसत नव्हती. मग आम्ही त्या पिशव्या पुन्हा उलट केल्या आणि वरची पान खाली खालची पानं वर केली. तेव्हा ओजस म्हणाला, त्यावेळेला आम्हाला काहीच्या पिशव्यांमध्ये गांडूळ, गोगलगाय आणि पानकिडा दिसला. आता पाने थोडी काळी झाली आहेत. मी रोज मातीला हात लावते. माती बनवताना मला फक्त एक त्रास होत होता तो त्याचा वास.



स्वराला वाटलं होत की, पानांची माती लवकर तयार होईल. पण ती तयार झाली नाही. मला मधे मधे खूप वाईटही वाटत होतं; पण वाळलेल्या पानांचा, ज्याची माती होत आहे त्याचा स्पर्श खूप आवडत आहे. ताईनी सांगितलं होतं की, माती बनायला वेळ लागतो. मिक्सरवर बारीक

केलेल्या पानांचा रंग आम्ही हाताने बारीक केलेल्या पानांपेक्षा लवकर काळा झाला. आम्ही आमच्या काही पिशव्यांमध्ये घरून आलेली कडधान्ये पेरली. जेव्हा माझ्या पिशवीत रोपं आली तेव्हा मी खूप खूप खुश झालो. मला वाटलं की, आता माती तयार झाली. पण आम्ही पिशवीत खूप धान्य पेरली म्हणून रोपांची वाढ खूप झाली नाही. आमच्या शाळेजवळच्या खारींनी प्रग्यानची रोपंच खाल्ली. मीत हाताने बारीक केलेल्या आणि मिक्सरवर बारीक केलेल्या पालापाचोळ्याची माती कधी होईल याची वाट पाहत होता. ती माती कशी दिसेल हे पण त्याला बघायचंय. त्याला वाटतंय की तो तिसरीतून चौथीत जाईपर्यंत तरी माती तयार होईल.

**अदिती घाडीगावकर**

ghadiaditi26@gmail.com



# समज-गैरसमज

काही महिन्यांपूर्वी, जेव्हा भारत सरकारने आफ्रिके हून काही चित्ते आणून भारतातील जंगलात सोडण्याचा निर्णय घेतला, तेव्हा अने कांना खूप आश्चर्य वाटले होते. त्यांचे म्हणणे असे होते, की आपल्याकडे जवळपास सर्व जंगलात, उसाच्या शेतात, एवढंच काय तर अगदी मुंबई लगतच्या नॅशनल पार्कमध्ये सुद्धा आढळणारे चित्ते, मुद्दाम अफ्रिकेहून आयात करण्याची गरजच काय? या लोकांच्या गोंधळाचे कारण असं होतं, की ते ज्या प्राण्याला चित्ता समजत होते, तो खरंतर बिबट्या किंवा बिबळया म्हणून ओळखला जाणारा प्राणी आहे. चित्ता आणि बिबळया यांमध्ये खूपच फरक आहे. दोघेही मार्जार कुळातील, म्हणजेच मांजरीच्या कुटुंबातील, ज्यांना बिग कॅट किंवा मोठे मार्जार म्हणून ओळखलं जातं, त्या वर्गातील हे प्राणी आहेत. दोघांच्याही अंगावर ठिपके असल्यामुळे लोक सरसकट बिबळयाला ही चित्ता म्हणत असावेत. पण चित्त्याच्या अंगावरील ठिपके भरीव असतात तर बिबळयाचे ठिपके पोकळ वर्तुळाकार, थोडेसे गुलाबाच्या फुलासारखे दिसतात. बिबळयाला मराठीत विवढ्या आणि तेंडवा देखील म्हणतात, तर हिंदीत तेंदुआ आणि इंग्रजीत leopard असे म्हणतात. जिम कॉर्बेट यांचे Man eater leopard of rudraprayag हे पुस्तक प्रसिद्ध आहे. आणि गमतीची गोष्ट म्हणजे त्याच्या मराठी भाषांतराचे नाव देताना पुन्हा तीच चूक झालेली आहे, "रुद्रप्रयागचा नरभक्षक चित्ता" आता बोला!



बिबळया



काळा बिबळया

बिबळया बद्दलचे गैरसमज इथेच संपत नाहीत. कधी कधी बिबळयाच्या प्रजनन काळात, त्यांच्या पर्यावरणातील काही बदल आणि त्याच्यातील काही जनुकीय बदल यांच्या संयोगाने, एखाद्या मादीला झालेल्या दोन तीन बछड्यांपैकी एकामध्ये मेलानीन हे रंगद्रव्य खूप जास्त निर्माण होते व त्यामुळे ते पिलू पूर्ण काळया रंगाचे असते. असे बिबळे नजरेस पडल्यावर काही माणसांना ती एक वेगळीच प्रजाती आहे असे वाटले आणि त्यांना पैंथर किंवा ब्लॅक पैंथर असे नाव देण्यात आले. आणि अर्थातच हॉलिवूड च्या काही "मारव्हलस" चित्रपटांनी या गैरसमजाला हातभार लावला. या काल्पनिक वेगळया प्रजातीचा शास्त्रज्ञांना पत्ताच नाही. शास्त्रज्ञ तुम्हाला सांगतील की पेंथर असा प्रजाती वाचक शब्द नसून *Panthera* असा शब्द आहे; जो सर्वच मोठ्या मार्जार वर्गासाठी मिळून वापरला जातो. जसे की *Panthera tigris* (वाघ), *Panthera leo* (सिंह). खरं म्हणजे नीट निरखून पाहिले तर काळया बिबट्यांच्या रंगातही शरीराचा फिकट काळा रंग आणि ठिपक्यांच्या गडद काळा रंग वेगळा उठून दिसतो. तर असे हे बिबळे, आशिया आणि आफ्रिका खंडात सर्वत्र आढळून येतात. आणि मानवी वस्तीजवळ राहण्यासाठी त्यांनी स्वतःला चांगलेच जुळवून घेतल्यामुळे, नामशेष होण्याच्या धोका त्यांना वाघ सिंहा सारख्या प्राण्यांपेक्षा खूपच कमी आहे.

आता आपल्यापैकी ज्या मंडळींनी दक्षिण अमेरिकेचा दौरा केला असेल ते म्हणतील की आफ्रिका आणि अशियाच नव्हे, तर दक्षिण अमेरिकेतही त्यांनी बिबळया पाहिला आहे. पण तो त्यांचा गैरसमज असेल. कारण दक्षिण अमेरिकेत त्यांनी पाहिलेला प्राणी म्हणजे खूपच बिबळयासारखा दिसणारा जग्वार हा प्राणी असेल.



जग्वार



काळा जग्वार

हा मुख्यतः अमेझॉनच्या घनदाट अरण्यात आढळतो. हा जरी खूपच बिबळ्यासारखा दिसत असला तरी त्याचे ठिपके अधिक मोठे असतात, आणि वर्तुळापेक्षा थोडे चौकोनी आकाराकडे झुकतात. आणि दक्षिण अमेरिकेतही ब्लॅक पैंथर पाहिल्याचे कधी कानावर आलंच, तर चाणाक्ष वाचकांना लगेचच कळेल की ज्या कारणांमुळे काळे बिबटे जन्माला येतात, अगदी त्याच कारणांमुळे दक्षिण अमेरिकेत काळे Jaguar ही जन्माला येतात!

पण मुळात हा सगळा घोळ सुरू ज्या प्राण्यामुळे झाला, त्या चित्त्याचे काय? तर हो, चित्ता ही खरीखुरी प्रजाती आहेच, पैंथर सारखी काल्पनिक नाही. खरंतर जगातील सर्वात वेगवान धावपटू असलेली ही सेलिब्रिटी प्रजाती आहे. सुरुवातीला सांगितल्याप्रमाणे याचे ठिपके भरीव असतातच, पण बिबळ्या आणि चित्ता यामध्ये एवढं एकच फरक नाही. याच्या शरीराचा आकार बिबळ्या आणि इतर मार्जार वर्गीय प्राण्या पेक्षा पूर्ण वेगळा आहे. तो कुत्रा वर्गीय प्राण्यासारखा अधिक आहे. मांजर वर्गीय प्राणी हे ambush predators, अर्थात दबा धरून हल्ला करणारे प्राणी असतात. आणि त्याला साजेशी त्यांची शरीर रचना असते. चित्त्याचे पूर्वज असेच होते. पण उत्क्रांती दरम्यान बराच काळ त्यांना अश्या पर्यावरणात राहावे लागले, की जिथे दबा धरून शिकार करणे अशक्य होते, कारण तिथे कोणताही आडोसा उपलब्ध नव्हता. त्यामुळे त्यांना pursuit predators अर्थात धावत पाठलाग करणारे शिकारी बनावे लागले. पाठलाग करून शिकार करणारी मुख्य प्रजाती म्हणजे कुत्रा वर्गीय प्रजाती जसे की लांडगा, कोल्हा, तरस इत्यादी. त्यामुळे मार्जार वर्गीय असूनही हळूहळू चित्याचे शरीर पाठलागास अनुकूल, म्हणजेच कुत्रा वर्गीय प्राण्यासारखे झाले. हा बदल सोपा नव्हता. हा बदल पूर्ण होई पर्यंत चित्त्याच्या पूर्वजांना शिकारीत एवढे अपयश पहावे लागले की त्यांची संख्या जवळ जवळ नामशेष होण्याइतकी कमी झाली. त्यानंतर पुन्हा ते यशस्वी शिकारी बनले आणि आशिया आणि आफ्रिका खंडात सर्वत्र पसरले. त्यांच्या दोन उप प्रजाती आल्या, एक आशियायी आणि दुसरी आफ्रिकी. आत्ता असलेले सर्व चित्ते हे संख्येने अतिशय कमी असलेल्या पूर्वजांपासून उत्पन्न झालेले असल्यामुळे त्यांच्यात जनुकीय वैविध्य खूपच कमी आहे. त्यामुळे एखादा साथीचा रोग सुद्धा कदाचित त्यांची पूर्ण प्रजाती संपवू शकतो, आणि ही टांगती तलवार कायम त्यांच्या डोक्यावर राहणार. असो. तर या दोन उप प्रजातींपैकी आशियायी चित्ता आता फक्त इराण मधील काही भागात पाहायला मिळतो, कारण आशियायी सिंहांप्रमाणेच त्यांचीही अतिरेकी शिकार केली गेली. भारतातही आशियायी

चित्ता एके काळी मुबलक होता. मुघल सम्राट शेकडो चित्ते बाळगत असत. पण इथेही त्यांची अतिरेकी शिकार झाली आणि १९५३ सालि आंध्रप्रदेशात भारतातील शेवटचा आशियायी चित्ता मारला गेला.


चित्ता

लेखाच्या सुरुवातीच्या प्रश्नाचे उत्तर द्यायचे तर म्हणूनच आता भारतात पुन्हा चित्ते दिसायला हवे असतील तर ते आयात करावे लागणार आहेत. मध्यंतरी इराणमधून आशियायी चित्ते आणायचा प्रयत्न भारत सरकारने केला, पण तो अपयशी ठरला. त्यामुळे आफ्रिकेतून चित्ते आयात करण्यापलीकडे भारतापुढे आता दुसरा पर्याय उपलब्ध नाही. निदान सध्या जे वाघ, आशियायी सिंह, बिबट्या इत्यादी मोठे मांजर देशात अजूनही अस्तित्वात आहेत, त्यांना भविष्यात कधीही बाहेरून आयात करण्याची वेळ आपल्यावर येऊ नये, इतका प्रयत्न आपण करू शकतो. त्या सर्व प्रजातीना निदान त्यांच्या खऱ्या नावाने ओळखण्या इतकी तरी निसर्ग साक्षरता प्राप्त करणे, हे त्या दिशेने पहिले पाऊल असेल.

**आदित्य डोंगरे**

**aditya.dongre1@gmail.com**



# रानमेव्यातल बालपण

रम्य ते बालपण आणि रम्य त्या आठवणी आणि त्या आठवणीतल्या आंबट-गोड रानमेव्याच्या चटकदार चवी. त्या चवी अजूनही मनात रेंगाळतात. निसर्ग आणि नैसर्गिक रानमेवा हा आमच्या पिढीने भरपूर चाखला आहे व त्याचा पुरेपूर आनंद घेतला आहे. आत्ताच सेन्द्रिय-ऑर्ग्यानिक हे फॅड आमच्या कधी कानीही पडल नव्हत. कारण निसर्गाने थेट आमच्या बालनशीबी रानमेव्याचे अमृतासमान दान दिले होते.

आमच उरण माझ्या लहानपणी निसर्गसम्पन्न होत. त्यात नागाव, केगाव ही गावे म्हणजे शेती-मळयांचीच गावे. याच नागावात माझ बालपण निसर्गाच्या छत्रछायेत गेल. शाळेतून घरी आल्यावर आणि सुट्टीच्या दिवशी उठले की आख्खी वाडी हुंदडायची आणि त्यातच रमायच हे नित्याच ठरलेल. अभ्यासही वाडीतल्या एखाद्या हवेशीर झाडाखाली गोणता टाकुन करायचे. कंटाळा आला की उठायच आणि आजूबाजूच्या उपलब्ध असलेल्या रानमेव्याचा आस्वाद घ्यायचा.

आमच्या वाडीत सहा-सात वेगवेगळया प्रकारच्या बोरांची झाडे होती. त्या प्रत्येक बोराची चव वेगवेगळी. अगदी आंबट, पिठूळ, आंबट-गोड, गोड, एका बोरीची बोरे लाल होऊन सुकायला आल्यावरच चांगली लागायची, एक तर कडूच लागायची. त्या प्रत्येक बोराचे आकार आणि रंगांच्या छटाही वेगगेगळ्या. लांबट, गोल, चिनी-मिनी म्हणजे एकदम बारीक बोरे असे सगळे प्रकार होते. बोरा-चिंचांच्या सिजनला गावातील लहान मुलेही आमच्या बोरीखाली बोरांचा आस्वाद घ्यायला यायची. सकाळी सडा पडलेला असे. मग आईसोबत तो गोळा करताना मजा यायची. मधेच एक दोन बोरे पडली की ती ताजी बोरे नव्याने वेचण्यात आनंद वाटायचा. दोन दिवसाआड आई बोरे पाडायला माणूस बोलवायची. तेव्हा गावातल्या मुलांनाही गोळा करण्यासाठी बोलवायची. बोरे पाडणारा वर चढून झाडाच्या फांद्या गदा-गदा हलवायचा तेव्हा तो बोरांचा पाऊस पडलेला बघताना गंमत वाटायची. सगळयात जास्त जिथे बोरे पडली त्या जागी बोरे गोळा करण्यासाठी झुंबड पडायची. गोळा करता करता आवडेल ते बोर तोंडात टाकायचा व त्याचा स्वाद अनुभवायचा यात विशेष गंमत होती. जमिनीवर पडलीयेत म्हणून धुवून खायची असा काही प्रकार तेव्हा नव्हताच. प्रत्येक बोरीची वेगवेगळी टोपली आई ठेवत असे. जी मुले बोरे गोळा करायला येत त्यांना आई त्यांच मन भरे पर्यंत बोरे द्यायची. मग आजू-बाजूला, नातेवाईकांना वाटे काढून ठेवायची. अण्णा म्हणजे माझे वडील त्यांच्या कंपनीतल्या मित्रांना, मुंबईतील नातेवाईकांना कामावर जाताना ही शिदोरी नेत असत. आई प्राथमिक शाळा शिक्षिका. ती ही शाळेतील आपल्या मैत्रिणींसाठी न्यायची, भाऊ त्याच्या मित्रांना द्यायचा आणि

मी पण माझ्या मैत्रिणींना खिसाभरून शाळेत बोरे न्यायचे. राहिलेली बोरे विकत घ्यायला सकाळी एक-दोन भाजी विक्रेत्या बायका यायच्या, तेव्हा मोठी पाटी म्हणजे टोपली ५० रु. छोटी पाटी ३० रु. अशा घाऊक भावाने बोरे विकली जायची. बोरांचा सिजन संपत आला की बोरी खाली आम्हा लहान मुलांची झुंबड पडायची ती बोरीच्या हाट्या म्हणजे बिया फोडून त्यातील छोटा दाणा काढण्यासाठी. एक सपाट दगड व एक बी फोडता येईल असा गोलाकार दगड घेऊन या बिया काढण्याचा उद्योग चालायचा. काही जण त्या दाण्यांची चिक्कीही बनवायचे. मला नुसतीच खायला आवडायचे ते दाणे. बोरीखाली बरेचदा काटेही लागायचे पण पर्वा होती कुणाला त्याची. लागला काटा की त्याचा बाऊ न करता हाताने काढायचा आणि पुन्हा बोरे-हाटया गोळा करण्यात दंग व्हायच असे ते दिवस होते.






चिंचांच्याही बाबतीत अगदी तसेच. चिंचांचेही काही प्रकार होते. आंबट-ढस, आंबट-गोड, बुटकी चिंच, लांबट चिंच आणि एक शेताच्या बांधावरची पूर्ण गोड चिंच होती. ती माझ्या आवडीची. मी त्याच झाडाखाली अभ्यास करायला बसायचे. पिकलेल्या चिंचा कधी पडतील याची आतुरता असायची. कितीही खाल्या त्या गोड चिंचा तरी दिल मांगे मोअर असच होत त्या चिंचेबाबत. बर ह्या सगळ्या चिंचा पिकल्यावरच खायच अस नाही त्या चिंचेचा पाला, फुले पण तोंडचाळा म्हणून खायचो. त्यानंतर चपट्या छोट्या चिंचा लागल्या की त्या कोवळ्याच काढून खायला मजा यायची. जरा भरल्या की मग त्या कच्च्या चिंचा जवळ असतील तर फांदी वाकवून नाहीतर दगडाने पाडून त्याला मिठ-मसाला-साखर लावून खाणे म्हणजे परमानंद. त्यानंतरची स्टेज असायची गुरमटलेल्या चिंचा. ना पिकलेली ना कच्ची अशी ही चिंच सर्वच लहान मुलांना प्रिय असायची. अशी चिंच खाली पडलेली मिळण म्हणजे जवळ जवळ लॉटरी लागण्यासारखीच असायची. आंबट चिंचा खाऊन दात आंबायचे पण पर्वा कोणाला होती त्या रानमेव्यापुढे. घरी आई-आजी चिंचा काटळायच्या मग काटळलेल्या चिंचांचे चिंचोके मिळायचे. ते चुलीत भाजायचे.

ते ही मैत्रिणिंना नेण्यात फार गंमत असायची. हे चिंचोके चावायला खूप वेळ लागायचा पण त्याची चव म्हणा किंवा खमंगपणा म्हणा मनावर राज्य करायचा.

आंब्याची झाडे तशी उरणमध्ये सगळीकडेच होती. आमच्या वाडीतही वेगवेगळया प्रकारच्या आंब्याचे प्रकार होते. पण मैत्रिणिंबरोबर कै-यांचा आनंद वाटून घेण्यासाठी आम्ही मैत्रीणी शाळा सुटली की नागाव रोडच्या बापशेटच्या वाडीतून कै-या-आंबे पडलेत का ते बघत आणि गोळा करत घरी जायचो. कैरीसाठी मिठ-मसाला कधी कधी आम्ही सोबत न्यायचो. घरात पिकवलेले आंबे आणि झाडावर पिकून पडलेला आंबा याच्या गोडीत फरक असतो. पडलेला आंबा पक्षाने खाल्लेला असायचा थोडा किंवा फुटून थोडा खराब झालेला असायचा पण तो भाग सोडून पिकलेला आंबा म्हणजे अमृत. मग त्यापुढे डझनभर आंबेही फिके पडतात. कैरी-आंबा मिळाला की शेयर करुन खात खात घरी जाताना मैत्रीणींमधली मैत्री घट्ट होत गेली आणि आठवणींची पुंजी आपोआप जमा झाली. आंबे पिकून गेले की शेकोटीत किंवा चुलीत आंब्याचे बाठे भाजून त्याची कोय खायचो आम्ही. ती खरपूस भाजलेली कडेला करपून काळी झालेली कुडकुडीत कोय सुरुवातीला कडू लागायची पण त्यावर पाणी प्यायल की गोड लागायच. अजूनही ती चव माझ्या मनात दरवळते.

ताडगोळे म्हणजे माझ्या जिव्हाळयाचा विषय. त्या उंच झाडावरून ताडगोळे उतरवले की मोठ्या पाट्या म्हणजे टोपल्या घेऊन ते सोलायला माणूस बसायचा. वडील मला तिथेच बसवून ठेवत व जेव्हढे पाहिजे तेव्हढे खा सांगत. ते ताजे ताजे पांढरे लुसलुशीत गोळे मनमुराद खाताना जो स्वर्गीय आनंद व्हायचा तो शब्दात सांगता येणार नाही. फळाचा भाग फक्त वरती कापून त्यात बोटे घालून फुरक्या मारत ताडगोळे खातानाचा अनुभव आता कोणी अनुभवत असेल का? ताडाच्या फळाच्या गोळयाभोवतीचा मधला कोंब त्याला मोग म्हणत थोडा कडवत लागतो पण तोही कधीतरी चाखण्यात मजा असायची. पावसाळयात ताडाची फळे पिकून पडायची. ती केशरी फळे सोलून त्यातील गोड रसही चाखला आहे. त्या रसाचे पदार्थही बनवतात. भात शेतीच्या कापणीच्या वेळेला शेतात ताडगोळयाची फळे रुतून त्याला मोड आलेली असायची. त्याला आम्ही मोडहाट्या म्हणत. या मोडहाट्या गोळा करायच्या आणि कोयत्याने दोन तुकडे करुन त्यातला गर खायचा म्हणजे आहाहा. ती चव ती गंमतच निराळी. ताडगोळयाचे झाड रुजले की त्याला लांबलचक मूळ येते त्याला तरला म्हणतात ते खणून उकडायचे त्यालाही एक विशिष्ट चव असते. ते चाऊन खाताना चांगलाच टाईमपास व्हायचा.

आमच्याकडे एक काप्या फणसाचे झाड होते. त्या फणसाला भरपूर फणस यायचे. साधारण वटपौर्णिमा आली की ते फणस काढले जायचे. फणस पिकले की घरात घमघमाट असायचा. वडील फणस कापायचे आणि मी ते कापता कापताच खायचे. फार सुंदर गरे असायचे त्या फणसाचे.

नंतर त्याच्या बिया उकडून खायचा टाईमपासही चालायचा. भोकराच्या झाडावर चढून मी कधी अभ्यासाला तर कधी अशीच टाईमपास म्हणून बसायचे. त्या भोकराची भोकरे पिकली की चिकट असली तरी चविला गोड लागायची. त्याचा गर तोंडात न जाता हाताला लागला की लवकर चिकटपणा जायचाच नाही. पण त्या पारदर्शकतेत गोडवा होता. जांभळांच्या सिजनमध्ये दिवसातून चार-पाच चकरा जांभळीखाली व्ह्यायच्या. दुपारच्या उन्हात तापलेली जांभळे मला विशेष आवडायची. उन्हाने तापून ती मऊ होत आणि त्यातल्या गरालाही जास्त गोडवा वाटे. झाडावरून काढलेल्यापेक्षा पडलेलीच जांभळे जास्त गोड लागतात कारण ती पूर्ण पिकल्यावरच पडतात. ती ढेपळात पडायची, पानांवर पडायची मग तो भाग झटकून ते गोड-मिट्ट जांभूळ खाण्यातली गंमतच काही और.

आमच्या वाडीच्या कंपाउंडला (आम्ही त्याला वारंग म्हणायचो) करवंदाची झाडे म्हणजे करवंदाची जाळी होती. करवंदाच्या झाडाचे कोवळे कोंब कोणी खाल्ले आहेत का? मी खायचे. एक वेगळाच स्वादलहरी तरंगायच्या ते खाताना. उन्हाळयात करवंदे आली की कच्ची त्या काट्याकुट्यातून काढायला हात सरसावायचे. मग ती करवंदे काढून थोडी कच्चीच मिठाबरोबर खायची आणि कधी-कधी पाट्यावर वाटून चटणी बनवायची. त्या चटणीला अप्रतिम अशी चव लागायची. करवंदे पिकली की खायला गोड लागायची.





पिकलेली करवंद बरेचदा पानामागे लपाछुपी खेळत असत मग त्यांना शोधून काढायचे. करवंदात फिकट आणि गडद लालसर रंग सापडायचे मग गडद लालसर कोंबडा आणि फिकट कोंबडी असा पारंपारिक खेळ चालू व्हायचा. दुसऱ्याने ओळखाचे कोंबडा की कोंबडी फक्त उत्तर बरोबर आले की आनंद असायचा. अशा अनेक छोट्या छोट्या खेळांमध्ये पण खूप मोठा आनंद दडलेला होता

बालपणी. शाळेतून येताना गोसपाडा सुरु व्हायच्या चौकात गुरांचा दवाखाना होता त्यात रस्त्याला लागुनच गुलाबी मोठ्या करवंदाचे झाड होते. खूप जणं न्यायची तिथून ती गुलाबी मोठी करवंदे. त्यामुळे ती कधीतरी मिळाली तरी आनंदी आनंद असे. काही बायका तर ती करवंदे केसात माळायच्या.

आमच्या वाडीत एकच शिवणीच झाड होत. ती शिवणीची बी आम्ही अशी का खायचो याच कारण मला अजूनही माहीत नाही. शिवणीची फळे खाली पडलेली शोधायची. ती सोलायची मग त्याची बी खडबडीत जागेवर आधी घासायची. हे करताना एक मधाळ गंध दरवळायचा मग ती बी परत स्वच्छ धुवून फोडून खायची. साधारण बदामासारखा प्रकार. पण ती एवढी प्रोसिजर करायचोच आम्ही भावंड आणि एवढ्या मोठ्या कष्टाने तो एवढासा दाणा खाताना काय सुख वाटायच कारण तो दाणा कष्टाचा असायचा. गावठी बदाम पिकले की काही आपोआप गळत तर काही पक्षी खाऊन पाडत. गावठी बदामाच फळ खायला पण गंमत वाटायची. त्या बदामाचा गुलाबी रंगच इतका आकर्षक असायचा की खाण्याचा मोह आवरायचा नाही. मग हे बदाम दगडावर फोडून त्यातली बी खाण्याचा सपाटाच लागे.

पावसाळ्यात आई-वडील करांदे खणायचे. हे करांदे कडू असायचे पण त्यावर आई-आजी भरपूर शिजवण्याची प्रक्रिया करत मग त्याचा कडवटपणा कमी होत असे. पण हेही खायला आमच्या पिढीला आवडत होते व अजून आवडतात. पावसाळ्यात हळद्याचे कंद सापडायचे. तीन पानांची वेल मलाही ओळखता यायचे मग ते खणून धुवून कच्चेच खाताना आपण ऋषीकन्या वगैरे असल्याचा फिल यायचा.

राय आवळ्याची आणि जाम ची झाडे आमच्या बाजूच्या नाना-पाटील यांच्या वाडीत होती. माझी आत्याही तिथलीच त्यामुळे आम्ही आजू-बाजूची मुले तिथे आणि आमच्या वाडीत खेळायचो आणि मनमुराद रानमेव्याचा आस्वादही घ्यायचो. तर तिथले राय आवळे झुंडीने गोळा करायचे आणि वाटे करुन खायचे हे ठरलेले होते. तिथे जामचे मोठे झाड होते. मधून मधून ते जाम पडायचे. ते पडलेले जाम थोडे फुटायचे मग ती माती बाजूला काढून ते जाम खाण्यातही खुप गंमत होती. तिथेच लिंबाचेही एक झाड होते. मग तिथल्या मैत्रिणी लिंबं काढून ते सोलून त्याला मिठ लावून आम्हाला पण एक एक फोड खायला द्यायच्या. ती फोड चाखताना हिरवा-आंबट गंध मनामध्ये दरवळायचा.






अस्वन: आमच्या वाडीतल्या एका झाडावर गोळा करुन संपली की आम्ही आमच्याच गावातील मांडळात (गावातील एक आळी) जायचो तिथे बांधावर असलेल्या अस्वनीला भरपूर आणि चांगली पिठूळ अस्वने असायची. काळी कुळकुळीत होऊन पडली की ती गोड-पिठूळ मोत्याएवढी अस्वने खाताना धन्य वाटायच.

आमच्या नागाव रोडवरच घाणेरीची झाडे होती. त्या घाणेरीची छोटूकली फळे काढून खाण्यात मोठाली गंमत वाटायची. हल्ली वाचनात आल की ती फळे विषारी असतात पण आम्हाला कधीच कुठला त्याने त्रास झाला नाही.

आंबाड्याची गावात एक खास आळी होती तिथे जाताना आंबाड्याखाली जातो अस म्हणायचे. तिथे रस्त्यालाच आंबाड्याच झाड होत. त्या आंबाड्याचे कोवळे आंबाडे खायला मजेशीर लागायचे. पिकल्यावरच्या आंबाड्यांनाही एक विशिष्ट सुगंध असतो तेही मला आवडायचे. आमच्याकडे जुन झाड होत आंबाड्याच त्याची देठे, कोवळी पानेही खायला चविष्ट लागायची.

बापशेटच्या वाडीत कोणाच्यातरी दारासमोर तुतीने लगडलेले झाड होते. एकदा माझ्या मैत्रिणीने त्या तुतीचा आस्वाद दिला होता. ती तुती तोंडात टाकताच विरघळली आणि एक वेगळी चव मला तेव्हा कळली. त्या पिकलेल्या तुतीचा रंग इतका लाल-काळपट होता की मला वाटायच याचीच शाई बनवत असतील.

समुद्रकिनारी जाण्यासाठी वि-यातून (पावसाच्या पाण्याचा नाला) वाट होती. तिथे विलायती चिंचा लागलेल्या असायच्या. त्या लाल-गुलाबी विलायती चिंचा झाडावरून पाडण्यासाठी झुंबड असे. त्या पाडून त्यातील पांढरा गर घशाला अटकायचा तरी सगळ्यांबरोबर खाण्याच्या चढाओढीत त्या चिंचाही गोडच लागायच्या.

सांगा बर बिट्टी, कोरंटी(तालिमखाना), रानातली निळी अबोली, एक्सोरासारखी गुच्छात लाल फुले असतात त्याची देठातून मध कोणी-कोणी चाखली आहे? ते ओढतना जरासा त्या देठाच्या पोकळीतून मधूरस यायचा पण तो इतका गोड होता की त्याची चव अजूनही मनात रुंजी घालते. अस फुलपाखरासारखंच आमच्या काळच बालपण होत. मुक्तपणे या रानमेव्यावरून त्या रानमेव्यावर भटकणारं.

**सौ. प्राजक्ता पराग म्हात्रे**
**prajaktamhatre.77@gmail.com**



# जंगलातली रात्र

दरवर्षी मी नागझिरा या जंगलात जातो. प्रत्येक वर्षी मी आवर्जून वन्य प्राण्यांच्या गणनेत भाग घेतो. ही गणना उन्हाळ्यात मे महिन्यात बौद्धपौर्णिमेच्या दिवशी घेतली जाते. वन्य प्राण्यांची मोजदाद करण्यासाठी या दिवसाची निवड केली गेली कारण या दिवशी चंद्रप्रकाश खूप चांगला असतो. त्यामुळे आपल्याला टॉर्च लावायची गरजही भासत नाही. या दिवशी जंगलाच्या अगदी अंतर्भागात जाण्याचा योग असतो. जंगलात असा निराळा अनुभव सर्व सामान्यांना मिळावा यासाठी या दिवशी पर्यटकांना मचाणावर बसण्याची संधी दिली जाते. मी गेली ५ वर्षे याचा पुरेपूर फायदा घेत आहे. जंगलात रात्रीच्या वेळी प्राणी बघता येणं ही एक पर्वणीच आहे. उन्हाळ्यात सगळीकडचे पाणी आटून जाते; पण वनविभागाने बांधलेल्या कृत्रिम पाणवठ्यांमध्ये बाराही महिने पाणी असते, त्यामुळे सगळे पशुपक्षी या पाणवठ्यांवर आकर्षित होतात. मग प्राण्यांची संख्या मोजता येणं खूप सोपं आणि सोयीस्कर होऊन जातं. अशा वेळी चांदी अस्वल (Honey Badger), साळींदर, अस्वल यांसारख्या पक्क्या निशाचर प्राण्यांना देखील दिवसा पाण्यावर यावंच लागतं. असे सहसा दृष्टीस न पडणारे प्राणी आपल्याला पाहता येऊ शकतात. ही संधी मी कधीच सोडली नाही.

२०१८ च्या गणनेत मी सहभागी झालो होतो. सकाळी ९ वाजता आम्हाला वनविभागाच्या गाडीतून सोपवलेल्या ठिकाणी सोडण्यात आलं. मी गेलो तेव्हा तिथे एक वनकर्मचारी गाडीचा आवाज ऐकून बाहेर आला. त्याच्यासोबत मी अर्धा किलोमीटर आत चालून मला दिलेल्या पाणवठ्यापर्यंत पोचलो. माझ्याकडे एक नोंदी ठेवण्यासाठी प्राण्यांची यादी दिली होती. त्यात सकाळी ९ ते संध्याकाळी ६ पर्यंतच्या नोंदी करायच्या असतात. मला बंदरझरा सौरपंप टाका हा पाणवठा मिळाला होता. या जागेवर वानरांची खूप रेलचेल असते म्हणून हे नाव देण्यात आलं. माझी मचाण या पाणवठ्यापासून २० फुटांवर होती. मी मचाणावर जायच्या आधी पाणवठ्याच्या काठी एक फेरी मारली. आदल्या रात्री कोणकोणते प्राणी पाणी प्यायला येऊन गेले ते पाहू लागलो. मला बिबट्याचे ताजे ठसे दिसले. या ठश्यावरून ही एक मादी आहे हे कळलं. ती आज पण मला दिसेल या आशेने पटकन मचाणावर जाऊन बसलो. ही मचाण अगदीच दोघांना कशीबशी बसायला होईल एवढीच होती. मचाणावर फार सुखसोयी नसतात. जेमतेम बसण्यापुरती जागा असते. आमची मचाण १५ फुटांची होती. ही मचाण कोणत्याही प्राण्याला माणसाचा सुगावा लागू नये म्हणून हिरव्यागार फांद्यांनी झाकलेली असते. मी वर चढून सगळं सामान व्यवस्थित लावलं आणि स्थिरस्थावर होऊन बसलो. सगळ होईपर्यंत १०.३० वाजले होते.

संध्याकाळच्या ५ वाजेपर्यंत पाण्यावर २५ वानर, १ नीलगाय येऊन गेले. ६ वाजल्यानंतर दिवस मावळू लागला आणि काळोख पडू लागला. जसजशी रात्र होऊ लागली तसतशी माझी उत्सुकता वाढायला लागली. काळोख पडायला लागला तसा घुबडाचे घुत्कार सुरु झाले. घुबडांच्या मागून रातव्यांचा चक्कूsss चक्कूsss आवाज जंगलात घुमू लागला. या आवाजांनी अख्खं जंगल दुमदुमून गेलं होतं.



दिवसा भासलेलं तेच जंगल रात्रीच्या वेळी जास्ती गूढ वाटू लागलं. काळोखात समोरच काहीच दिसत नव्हतं. फक्त आवाज येत होते. थोड्यावेळाने चंद्र उगवला. रात्र होऊन एक घटका झाला होता. पाण्यावर कोणीच आल नव्हतं. चंद्राचा लख्ख प्रकाश पाण्यावर पडल्यामुळे पाणी चकाकत होत. बरोबर ७:३० वाजता माझ्या मागच्या जंगलातून पाचोळा वाजला. आवाजावरून तरी कोणतंतरी मोठ जनावर येतंय हे लक्षात आलं. मला जरा वेगळीच शंका येऊ लागली. आवाजावरून मला ते अस्वल वाटल होतं. तेवढ्यात माझ्या बाजूला असलेला वनमजूर कानात पुटपुटला "दादा आस्वली... आस्वली... (अस्वलाला गोंड आदिवासी आस्वली म्हणतात)". त्याने मला लगेच बोटाने दाखवलं. मी तिकडे पाहिलं तर आमच्यापासून साधारण १५ फुटांवर एक भलं मोठ अस्वलाच धूड आमच्याकडेच पाहत आहे असं दिसलं. आम्हाला मात्र त्याचं पांढरट तोंड फक्त दिसत होतं. आम्ही उत्सुकतेने त्याच्याकडे बघत होतो. आकारावरून तो एक नर होता. तो रानवाटेवरून आमच्या मचाणी खाली आला आणि हुंगायला लागला. थोडावेळ हुंगून कसलाही धोका नाही कळल्यावर तो पाण्याकडे गेला आणि पाणी पिऊ लागला. त्यावेळेस इतकी शांतता होती की त्याचा पाणी शोषून घेतानाचा आवाज आम्हाला ऐकू येत होता. खूप वेळ पाणी पिऊन

झाल्यावर तो निघून गेला. परत थोडावेळ शांतता पसरली. परत एकदा जोराचा पाचोळा वाजला. एक मोठं अस्वल पाण्याच्या दिशेने धावत आलं. इतक्या जोरात आलं की ते पाण्यात पडलं. पाण्यात पडल्यामुळे त्याच्या नाकातोंडात आणि कानात पाणी गेलं. त्यामुळे ते अस्वल खूप चिडलं आणि त्याने खूप मोठ्याने घाणेरडा आवाज काढला. हा आवाज मी पहिल्यांदाच ऐकल्यामुळे माझ्या छातीत धडधडलं. त्याने मान वाकडी करून कानात गेलेल पाणी काढलं. आणि जंगलात निघून गेला. ही मज्जा आम्ही चंद्राच्या प्रकाशात बघत होतो. तो गेल्यावर लगेच दुसऱ्या मिनिटाला मागून दुसरे अस्वल आलं आणि पहिलं अस्वल ज्या दिशेला गेलं त्याच दिशेला ते गेलं. तेवढ्यात वनकर्मचारी हलक्या आवाजात बोलला " लाग जी... हे लाग करत्यात आत्ता जी!! (लाग म्हणजे मिलन मे महिना हा प्राण्यांचा पिल्लं देण्याचा काळ असतो.)" आणि खरच त्यांचा घाणेरड्या आवाजात लाग सुरू झाला. अस्वलाचं मिलन हे माझ्यासाठी अविस्मरणीय होतं. हळूहळू हे आवाज दूरदूर जात विरून गेले. याने माझी झोपच उडाली होती आणि पुन्हा ताजातवाना होऊन आवाजाचा कानोसा घेऊ लागलो.



थोडावेळ गेला आणि आमच्या मचाणीच्या खालून कसला तरी आवाज झाला. दोन बांबूच्या फटीतून खाली पाहिलं तर ते एक साळींदर होत. आम्ही जो आवाज ऐकला तो त्याच्या काट्यांचा एकमेकांवर घासल्याचा आवाज होता है लक्षात आलं. त्याला आम्ही वरती आहोत हे माहितीच नव्हतं. ते सरळ पाण्यावर गेल आणि पाणी पिऊन लगेच निघून गेलं. इतक्या जवळून एका साळींदराला बघणं म्हणजे माझ्यासाठी पर्वणीच होती. मी मचाणावर उड्या मारायचा बाकी होतो. साळींदर गेल्यावर दोन घटका पाण्यावर कोणीच आलं नव्हतं. इतक्या वेळात मी तहानभूक सगळं विसरून गेलो होतो. म्हणून दोन घोट पाणी प्यायलं. तेवढ्यात आमच्या समोरच्या

जंगलातून पॉकsss पॉकss असा जोराचा धोक्याचा इशारा येऊ लागला. हा आवाज हरणांचा होता. मी दगडासारखा स्तब्ध होऊन त्या दिशेला उत्सुकतेने पाहू लागलो. कोणतातरी शिकारी प्राणी असल्याची ती खुण होती. धोक्याचे इशारे जसजसे जवळ येऊ लागले तसतसा मी अधीर होऊ लागलो. अचानक पाण्याच्या काठावर एक प्राणी येऊन बसलेला आम्हाला दिसला. चंद्राच्या प्रकाशात त्याच्या बाह्याकृती वरून तो बिबट्या आहे हे आम्हाला कळलं. त्याचं पोट भरल्यासारख वाटतं होतं. याचा अर्थ त्याने कोणत्यातरी प्राण्यावर नुकताच ताव मारला होता है आम्हाला कळलं. त्याने २० मिनिटं पोटभरून पाणी प्यायलं आणि न रेंगाळता तिथून निघून गेला. बिबट्या गेल्यावर तिथे कोणताही प्राणी आला नाही. थोड्यावेळाने उजाडलं. दिवस उजाडल्यावर आम्ही सगळं सामान आवरून वनविभागाच्या गाडीतून परत आलो. रात्रीचं जग किती भारी असतं याचा पुन्हा एकदा प्रत्यय आला. ही आठवण मनात साठवून मुंबईला परत आलो.

**जंगलमित्र उन्मेष परांजपे**

**unmeshparanjape@gmail.com**



# खारेपाटातल्या शेंगा

उत्तर कोकणातल्या शिल्लक खारजमिनींवर (अजून तरी) भातशेती केली जाते. पावसाचा जोर मंदावल्याच्या काळात शेतीची किरकोळ कामे चालू असतात. या लहानसहान कामांसाठी गावापासून दूरवर असलेल्या खारपट्ट्यांतील शेतांकडे त्यांच्या फेऱ्या होत असतात. या नेहमीच्या फेऱ्यातून घरी परत येत असताना हा शेतकरी सहसा कधी रिकाम्या हाती परत येताना दिसत नाही. रस्त्यांच्या कडेला, शेतांच्या बांधांवर निसर्गत: मिळणारे फळे, फुले, कंद यांसारखे जिन्नस तो भरभरून घेत असतो. बऱ्याचवेळेस खाडीवरून परत येणाऱ्या शेतकऱ्यांच्या हातात एक हिरव्या रंगाचा वेणीदार गोफ दिसतो. बारकाईने पाहिल्यास या वेणीच्या एका टोकाला लहान लहान शेंगाही लगडलेल्या दिसतात, स्थानिक भाषेत शेंगांचा उच्चार 'शिंगा' असा होतो. त्यामुळे या शेंगा 'तेलशिंगा' म्हणून ओळखल्या जातात. काही ठिकाणी त्यांना 'कोल्हीजच्या शेंगा असेही म्हटले जाते. विग्ना ल्युटेला (*Vigna luteola*) या शास्त्रीय नावाने ओळखली जाणारी ही वनस्पती आपल्या मुगाची चुलत बहिणच. तिचे फुल, शेंग आणि बियांच्या बाबतीत मुगाशी असलेले साम्य विलक्षण आहे. परंतु सातत्याने मूग गिळायची सवय असल्याने तेलशेंगांसाठी कोणी आवाज काढताना दिसत नाही. चवळी वंशाशीसुद्धा तिचे दूरचे नाते आहे. इंग्रजीतील 'हेअरी काऊपी' (Hairy Cowpea ) या नामातूनही हे नाते अधोरेखीत होते.





आफ्रिकेचा किनारी भाग, मध्य व दक्षिण अमेरिका, ऑस्ट्रेलिया आणि आशियाई भागांत ही वनस्पती आढळते. दक्षिण अमेरिकेत तिची भाताच्या पिकांतील तण अशीच ओळख आहे, तर दक्षिण आफ्रिकेतील राष्ट्रीय तण प्रजातीच्या यादीतही या वनस्पतीचा समावेश आहे. विविध प्रकारच्या मातीमध्ये ती रुजू शकते, पण मातीचे ओलसर असणे ही प्रमुख अट आहे. खाडीकिनाऱ्यांवरील ओलसर बांध ही अट पूर्ण करतात. त्यामुळे या परिसरात ही वेलीसारखी वनस्पती उगवते. या वनस्पतीकडे सुरुवातीला कोणाचे फारसे लक्ष जात नाही. मात्र मूळ वनस्पतीतून निघालेल्या फुटभर लांबीच्या देठावर अगदी टोकाला लागलेली सुंदर, नाजूक पिवळया रंगाची फुले आपले लक्ष वेधतात. याच फुलांच्या गुच्छाचे रुपांतर हळूहळू शेंगांमध्ये होते. लांब सरळ देठ आणि त्यावरील शेंगांच गुच्छ ही रचना आपल्याला चौकात उभ्या असलेल्या हायमास्टच्या दिव्यांची आठवण करून देते. पाच-सहा सेमी लांबीच्या लहान शेंगा मध्ये मुगासारखे दाणे तयार होतात. है दाणे कच्च्या स्वरुपात अथवा उकडून खाल्ले जातात, शेंग कोवळी असल्यास आवरणासह खाल्ली जाते, काही भागात फुलांची देखील भाजी केली जाते, तेलशेंगांची गोड मुळे सोलून खाल्ली जातात.



अन्नासह तिचे काही औषधी उपयोगही आहे. आफ्रीका, इथिओपिया येथील रेडवुड वनस्पतीच्या फुलांसह या वनस्पतीच्या पाने, फुलांचा वापर करून उपदंश व अल्सरसारख्या विकारांवर उपचार केले जातात. अर्जेंटीनामध्ये रक्तातील कोलेस्टेरॉल कमी होण्यासाठी तेलशेंगा वापरल्या जातात. तेलशेंगांची काही जंतुनाशक तत्वेही जात असून त्यावर अधिक संशोधन चालू आहे.

या मानवी उपचारांबरोबरच पॉलीनेशिया येथे घोस्ट सिकनेस या अमानवी मानल्या जाणाऱ्या उपचारांसाठी ही वनस्पती वापरतात. या वनस्पतीचे मृदेतील काही सूक्ष्मजीवांसोबत असलेल्या सहजीवी संबंधांमुळे वातावरणातील नायट्रोजन स्थिरावण्यास मदत होते. परिणामी परिसरातील इतर वनस्पतींना वाढीसाठी आवश्यक असणारा नायट्रोजन उपलब्ध होतो. जमिनीची धूप होऊ नये म्हणून वाढवल्या जाणाऱ्या वनस्पतीमध्येदेखील या वनस्पतीचा समावेश होतो. या वनस्पतीची पाने सुरवंटांना आकर्षित करतात. त्यामुळे अलिकडच्या काळात 'बटरफ्लाय गार्डन या संकल्पनेचा होत असलेला प्रसार पाहता तेलशेंगा ही वनस्पती या उद्यानांसाठी एक परिपूर्ण वनस्पती ठरु शकेल.

तेलशेंगांचा प्रसार निसर्गतःच होत असतो. परंतु मोठ्या प्रमाणावर लागवड करायची असल्यास तिच्या बिया उकळत्या पाण्यातून अल्पकाळ काढून नंतर पुन्हा सुकवल्या जातात. अशा पद्धतीने बियांची रुजवण क्षमता वाढवता येते. कडधान्याला पर्याय आणि खाऱ्या जमिनीत उगवण्याची क्षमता या दोन वैशिष्ट्यांवर किनारी भागात तिचे महत्त्व वाढायला हरकत नाही. खार जमिनीतील भातशेतीबरोबरच तेलशेंगा दिसण्याचे प्रमाणही कमी होत गेले. या शेतीबरोबरच, तेलशेगांच्या पूरक उत्पादनालाही चालना मिळावी ही अपेक्षा.

**तुषार म्हात्रे**

**tusharmhatre1@gmail.com**



## चाफ्याच्या झाडा.....

चाफा म्हटलं की आपल्याला सर्वप्रथम आठवते ती लतादीदींनी गायलेली कवी "बी" यांची रचना "चाफा बोलेना चाफा चालेना, चाफा खंत करी काही केल्या फुलेंना वर वर साधे वाटणारे हे काव्य जीवा- शिवाशी एकात्म साधणारे अद्वैत  सांगून जाते.

तसे पाहता चाफा ह्या नावाने अनेक वनस्पती ओळखल्या जातात त्याची फुले सुद्धा वेगवेगळया रंगाची, आकाराची असतात पण सर्वात एक समानता आहे ती म्हणजे सर्व फुले अत्यंत सुवासिक असतात त्यापैकी काही महत्वाच्या वनस्पतींचा घेतलेला हा एक आढावा.



पांढरा चाफा *Plumeria acutifolia*

आपल्याकडे सर्रास आढळणारा चाफा म्हणजे पांढरा चाफा. याला अनेक नावे आहेत. फ्रँगीपनी ट्री (फ्रेंच अर्थ साकळलेले दूध याच्या चिकासारखे) क्षीर चाफा याच्या खोडातून चीक पाझरतो म्हणून. खूर चाफा (क्षीर चाफ्याचा अपभ्रंश), देवचाफा किंवा "टेम्पल ट्री" यासाठी की मंदिराच्या आसपास याच एखाद तरी झाड असतंच. मंदिरचं नाही पण बौद्ध पॅगोडाच्या बाजूला पण याची झाडे असतात म्हणून हा "पॅगोडा ट्री" ह्या नावानेही ओळखला जातो. स्मशान आणि दफनभूमीत लावला जात असल्याने साहेबाने याच नाव "Dead Mans Flower" असं करून टाकलं. याच्या

पांढऱ्या सोडून लाल व पिवळसर रंगाच्या देखील काही जाती आहेत. हा एक मध्यम उंचीचा वृक्ष असून याला मोठी पाने असतात. फुलांचा आकार देखील मोठा असतो फुले अत्यंत सुवासिक असतात. खडकाळ जमिनीत किंवा कमी पाण्याच्या ठिकाणी देखील हा वृक्ष चांगला वाढतो. आपल्याकडे सगळीकडे आढळत असला तरी याच मूळ आहे दक्षिण अमेरिकेतील मेक्सिको. बऱ्याच वर्षांपूर्वी तो भारतात येऊन आता आपलासा झाला आहे. उद्यानात लावण्यासाठी याच्या बऱ्याच जाती विकसित केल्या आहेत. हा वन्य नसल्यामूळे याला आपल्याकडे फळे येत नाहीत. पण काही जातींना शेंगेसारखी जोडफळे येतात. याच्या फुलांपासून सुवासिक अत्तर बनवले जाते. या चाफ्याचे कुळ आहे Apocynaceae. याचे शास्त्रीय नाव आहे *Plumeria*, फ्रेंच वनस्पतिशास्त्रज्ञ चार्ल्स प्लुमेर याच्या स्मरणार्थ दिलेले नाव. याची सुवासिक जात *P. acutifolia* (पानाचे टोक निमुळते असल्याने), *P. obtusa* (पानाचे टोक बोथट असल्याने) व लाल रंगाची जात *P. rubra* (रुब्रा म्हणजे लाल). ह्याच चाफ्याची एक सुवास नसणारी पण पानांच्या वैशिष्ठयपूर्ण आकारामुळे हमखास बागेत लावली जाणारी एक जात म्हणजे *P. pudica*



*Plumeria rubra*

*Plumeria obtusa*





*Plumeria pudica*

प्रसिद्ध पत्रकार मृणाल पांडे यांच्या मातोश्री शिवानी यांच्या "स्मशान चंपा" या कादंबरीत एक उल्लेख आहे चम्पा तुझमे तीन गुण रूप रंग और बास. अवगुण तुझमे एक है, भ्रमर ना आवें पास यावर काव्यात्म पद्धतीने दिलेले उत्तरः चम्पा वर्णी राधिका, भ्रमर कृष्ण का दास यही कारण अवगुण भैय्या, भ्रमर ना आवें पास. अर्थात ते काव्यात्म असलं तरी चापयाचं स्वपरागीभवन किंवा पतंगाद्वारे परागीभवन होत.

सोनचाफा:

ज्ञानेश्वरांनी "तो कनकचंपकाचा कळा, की अमृताचा पुतळा." असा ज्याचा उल्लेख केला आहे तो वृक्षराज म्हणजे सोनचाफा.

*Michelia champaka*



याच्या फुलांचा आकर्षक पिवळा, केशरी, सुवर्णकांती रंग व मनमोहक सुगंध अक्षरशः वेड लावणारा आहे. रामायण, महाभारत आणि संस्कृत साहित्यात सोनचाफ्याचे अनेक संदर्भ येतात. सुंदर स्त्रीच्या हास्याने सोनचाफा फुलतो अशी एक कविकल्पना आहे.

सोनचाफा हा अस्सल भारतीय वंशाचा सदाहरित वृक्ष आहे. याला उन्हाळयात व पावसाळयात बहर येतो पण आता वर्षभर फुलणाऱ्या चाफ्याच्या जाती उपलब्ध आहेत. याच्या फुलाच्या कळयाच जास्त वापरात येतात. एकदा फुलले की त्याच्या पाकळया गळून पडतात. खरतर या पाकळया नसतातच. संदल व प्रदल यांची एकत्रित अशी ती रचना असते. चाफ्याचे पंचांग आयुर्वेदात वापरतात. सोनचाफ्याचे फुले अत्तर सुगंधी तेल, धूप, साबण यांच्या उत्पादनात वापरतात. तसेच याची फुले तुरटीच्या द्रवांत भरून कायमस्वरूपी शोभेच्या बाटल्यात साठवून ठेवतात. सोनचाफा हा Magnoliaceae कुळातील आहे. याचे शास्त्रीय नाव *Michelia champaka* असे आहे. अँटोनियो मायकेली या इटालियन शास्त्रज्ञाच्या सन्मानार्थ प्रजातीनाम तर चंपक हे संस्कृत नावावरून जातीनाम ठेवलं आहे. Tailed Jay, Common Jay व Common Bluebottle या फुलपाखरांची मादी या सोनचाफ्यावर अंडी घालतात.

भुंगा कधीच चाफ्याच्या फुलावर बसत नाही या गोष्टीची कवी भूषण यांनी छत्रपती शिवाजी महाराजांचे गुणगान करताना ...लेई रस ऐतिन को, बैठी न सकत है, अली अवरंगजेब चंपा "शिवराय है" असे रसपूर्ण वर्णन केले आहे. भुंगा (अली) जसा इतर सगळया फुलांतून मकरंद गोळा करतो त्याप्रमाणे औरंगजेब सगळया राजांकडून कर गोळा करतो परंतु सोनचाफ्याप्रमाणे असणाऱ्या शिवरायांच्या वाटेला मात्र तो जात नाही.

*Magnolia alba*



*Magnolia nilagirica*



*Magnolia nilagirica* हा दक्षिणेत निलगिरी पर्वतावर आढळणारा एक सदाहरित वृक्ष आहे. याची फुले पांढऱ्या रंगाची असून दिसायला सोनचाफ्याप्रमाणेच असतात, यालाही अप्रतिम सुगंध असतो. सोनचाफ्याचीच *Magnolia alba* नावाची एक पांढरी सुवासिक जात संकर करून विकसित केली असून आजकाल ती हमखास बागेत लावली जाते. याच्या पाकळ्या खूप नाजूक असतात. याच कुळातील मुखत्वे उत्तरेकडील पर्वतीय प्रदेशात आढळणारी एक जात म्हणजे महापुष्प चाफा *Magnolia grandiflora* याची पांढरी शुभ्र फुले अत्यंत सुवासिक असून याच्या फुलांचा आकार हाताच्या दोन्ही ओंजळीत मावणार नाही इतका मोठा असतो.



*Magnolia grandiflora*

कवठी चाफा:

मॅग्नोलिया कुळातील आणखी एक सर्वांच्या परिचयाचा चाफा म्हणजे कवठी चाफा *Magnolia pumila* (बुटका) याची पांढरी कवठासारखी अंड्याप्रमाणे दिसणारी फुले खूपच सुवासिक असतात. याला हिमचंपा असेही एक नाव आहे

*Magnolia pumila*



भारताबाहेर मॅग्नोलियाच्या विविध रंगाच्या जाती पाहायला मिळतात.

नागचाफा:

नागचाफा या नावाने ओळखला जाणारा छोटेखानी अस्सल भारतीय वंशाचा वृक्ष भारतात बऱ्याच ठिकाणी आढळतो. Mesua ferrea (दमास्कस येथील मेसु या अरेबियन पिता पुत्रांच्या स्मरणार्थ प्रजाती नाम व फेरुआ म्हणजे लोखंडी गंजाच्या रंगाप्रमाणे याच्या पालवीचा रंग) या वृक्षाचा समावेश कॅलोफायलेसी या कुळात होतो. नागकेसर, नागवृक्ष, नागचंपा अशा नावांनी देखील हा वृक्ष ओळखला जातो. नागचाफा हा एक छोटेखानी वृक्ष आहे. याची नवीन पालवी लाल किरमिजी रंगाची असते. पाने लांबट टोकदार असतात याची फुले मोठी, पांढरी व सुवासिक असतात. चार शुभ्र पाकळ्या व मध्यभागी पिवळाधम्मक पुंकेसरांचा गुच्छ असतो. याची फळे अंडाकार व टोकदार असतात. याच्या बियांपासून नवीन रोपे सहज तयार होतात.



*Mesua ferrea*

नागचाफ्याची फुले औषधी असून फुलांतील पुंकेसरांना नागकेसर म्हणतात. त्याचाही उपयोग आयुर्वेदामध्ये अनेक आजारावर केला जातो.

हिरवा चाफा:



*Artabotrys odoratissimus*

"लपविलास तू हिरवा चाफा सुगंध त्याचा लपेल का?" या गदिमांच्या गीतातून प्रसिद्ध झालेला हिरवा चाफा ही आरोही झुडूप लता आहे. याचे शास्त्रीय नाव *Artabotrys odoratissimus* (लोम्बणारा सुगंधी फळांचा घड) असून ते Annonaceae कुळातील आहे. ही सदाहरित आधाराने वाढणारी वेल असून याची फुले हिरव्या रंगाची असतात. फुलात तीन आत आणि तीन बाहेर अशा सहा जाड हिरव्या, मांसल पाकळया असतात. या वेलीवर अनेक हुक सारखे भाग असतात त्याद्वारे ती आधार घेत वाढते. याची फुले सुरवातीला हिरवी असतात व नंतर ती

"पिकून" पिवळी होतात आणि त्यांना गोड सुगंध येतो. नंतर त्याच जागी बोराएवढ्या हिरव्या फळांचा घोस येतो तोही पिकल्यावर पिवळा होऊन त्याला मंद गोड सुगंध येतो. याच्या फुलांपासून सुगंधी अर्क काढतात तसेच अत्तर सुगंधी तेल, धूप यातही याचा वापर करतात.

भुईचाफा:



*Kaempferia rotunda*

उन्हाळयात थेट जमिनीतून उमलणाऱ्या व् निळसर पांढऱ्या फुलपाखराच्या आकाराच्या पाकळया मिरवणारा भुईचाफा तसा दुर्मिळच. याचा सुगंध मंद, प्रसन्न करणारा, म्हणूनच आरती प्रभूंनी म्हटल आहे "गंधगर्भ भुईपोटी ठेवोनी वाळली, भुईचंपकाची पाने कर्दळीच्या तळी". याचे कंद जमिनीत सुप्तावस्थेत राहतात. उन्हाळयानंतर याला सुगंधी आकर्षक फुले येतात. हा फुलोरा जमिनीतून उगवल्यासारखा असल्याने याला भुईचाफा असे म्हणतात. फुलल्यावर याला पावसाळयात पाने येतात पाने वरून हिरवी असून त्यावर नक्षी असते व खालचा भाग जांभळट असतो हा Zingiberaceae या कुळातील असून याचे शास्त्रीय नाव *Kaempferia rotunda* (शास्त्रज्ञ कम्फेरा यांच्या स्मरणार्थ, तर रोटुडा म्हणजे भूमिगत कंद असणारा) याचे पंचांग औषधात वापरतात. यापासून तेल, मलम बनवितात.

*Pterospermum acerifolium*



आपल्याकडे मुचकुंद *Pterospermum acerifolium* नावाने माहीत असलेल्या फुलांना उत्तरेकडे "कनकचंपा" म्हणतात. तर आणखी एका पिवळया रंगाच्या सुवासिक *Ochna squarrosa* या फुलांच्या वृक्षाला "रामधनचंपा" असे म्हणतात.

*Ochna squarrosa*



तर असा हा चाफा म्हणून ओळखल्या जाणाऱ्या वनस्पतींचा आढावा.

(लेखातील सर्व प्रकाशचित्रे आंतरजालावरून साभार)

**विशाल शिंदे**

**vishalshinde2211@gmail.com**



# मुचकुंद

सकाळ रोजचीच असते. पुण्यातील मुळा मुठा नदीचा किनारा ही तोच. या किनाऱ्याच्या बाजूबाजूने जाणारी माझी प्रभात फेरीची वाट आहे. वाटेच्या दोन्ही बाजूला बूच, कांचन, पारसपिंपळ, ताम्हण अशी अनेक झाडे आहेत. त्यामुळे इथे फिरायला नेहमीच मजा येते. त्यात नदीवर येणारे पक्षी हेही एक आकर्षण असते.

असाच एक दिवस शांत निवांत वातावरण, पक्षांची किलबिल ऐकू येत असते आणि मन खूपच प्रसन्न असतं. मार्च महिना सुरू झालेला, त्यामुळे वातावरणात थोडासा उष्मा जाणवायला लागलेला.. आणि तशातच एक अनामिक सुगंध मनाला वेड लावून जातो आजूबाजूला बघते तर फुले कुठेच दिसत नाहीयेत.. मग सुगंध येतोय तरी कुठून? मी विचार करू लागते आणि कुतहल म्हणून एक अगदी पानासारखा दिसणारा पिवळसर सोनेरी रंगाचा गुच्छ उचलते, सहजच हुंगून बघते तो काया एवढा सुगंध भरलाय.....

कुतुहल म्हणून मग चहूबाजूंना बघू लागते कुठे फुले दिसतायेत का? अचानक नजर वरच्या बाजूला वळते, आणि तिथेच खिळून बसते. माझ्या वाटेच्या बाजूला जी उंच उंच वृक्षांची रांग आहे. ती अगदी फुलांनी डवरलेली आहे. ही फुले अतिशय वेगळीच दिसतात. फुलाचे देठ पिवळसर रंगाचे आणि जरा जाडसर असे आणि पांढऱ्या शुभ्र पाकळया, अगदी पक्षांची पिसं वाटावीत अशा पाकळ्यांना अजिबात वास नाहीये, पण फुलाचे देठ अतिशय सुगंधी आहे. मी हे झाड पहिल्यांदाच बघितले. त्यामुळे लगेच फुलांचा, देठाचा फोटो काढला आणि आमच्या विशाल नावाच्या मित्राला ते फोटो पाठवले. दुसऱ्या क्षणाला त्याचे उत्तर आले की हा तर मुचकुंद आहे.

मग मी भराभर त्याची माहिती गोळा केली आणि आश्चर्य म्हणजे या वृक्षाबद्दल खूप सारी माहिती मला इंटरनेटवर मिळाली. अतिशय उपयुक्त असा हा वृक्ष आहे. पानांचा वापर पत्रावळया बनवण्यासाठी करतात. म्हणूनच "डिनर प्लेट ट्री", Dinner Plate Tree (*Pterospermum acerifolium*) असेही एक नाव या झाडाचे आहे. पानांच्या खालच्या भागाचा वापर जखमेतला रक्तस्त्राव थांबवण्यासाठी, फुलांचा रस जखमा साफ करण्यासाठी, दाह कमी करण्यासाठी वापरला जातो. माहिती शोधताना या फुलांना "कनकचंपा" असं सुंदर नाव आहे हे कळले. कनकचंपा, अतिशय मंद मधुर सुगंध, उंच देखणा वृक्ष आणि त्याची ही वेगळीच फुलं खूप आनंद देऊन गेली, जीवनात घडणाऱ्या एखाद्या लहानशा प्रसंगाने भेटणाऱ्या एखाद्या व्यक्तीने जणुं आयुष्य उजळून टाकावे असा हा अनुभव होता.
त्यावर सुचलेल्या ओळी....

दरवळलेली वाट अचानक, आज मला भेटली
अत्तर उधळीत कुपी जणुं का, वाटेने चालली?

थबकून थोडे, इकडे तिकडे मीही बघू लागले....
झाडावरती कुठल्या फुलली, मंद सुवासिक फुले

नदीकिनारी उंच उभा तरू, दिमाखात देखणा
पायी त्याच्या अंथरलेल्या, कितीक सुगंधी खुणा...

देठ जाडसर सोनेरी, अन शुभ्र लांब पाकळया...
घनदाट वृक्ष मुचकुंद असे तो अंगांगी बहरला...

ओळख नव्हती, त्याची माझी आज पावतो जरी
वाटेवर एकाकी भेटला सुहृद मज कुणीतरी

ओढ सुगंधित कशी जागते, नकळत माझ्या उरी
वळतात पाऊले, थबकतात, अन् रोज नदीच्या तीरी

हितगुज जैसे मैत्रीणीस सांगावे उलगडुनीया
हलकेच हुंगते सुमनाला त्या अलगद उचलूनिया.....






**डॉ. अंजली देशपांडे**
**deshpandeanjalidr@gmail.com**

# सुरंगी

भाळून तुझ्यावर किती वेळा माळले तुला
तुझ्या नावात दडले काय सुरंगीच्या फुला

नाव तुझ सु---रंगी फुलून येतेस आंगोपंग
बंद केला कधी अत्तर रंग

दुर्मिळ वळेसर जर्द केशरी, बहकुन टाकणाऱ्या मोहक सरी
पायपीट करून एकदातरी, घालायचाच गजरा शेपट्यावरी



तुझ्या अत्तर कुपीत साठवली माझी, तारुण्य सय
नात्यांचा मैत्रीचा आणि पलीकडचा वाभरा संचय

तुला घालून मिरवण, मोहकण, मोहरण
आणि आज ही सगळं काही आठवण

आता संदर्भ बदललेत, तुझे नवीन रंग उलगडलेत
तुझ्या नाजूक वळेसरात किती अर्थ लपलेत

माझा एक गजरा, किती जणीच्या रानात चकरा
त्यांची झाडावर चढण, अवघड घसरण
मला कधी जणवलच नाही !!

तू माझा एक अट्टाहास, वेड्या वयातला लहानसा विलास
पण, कितीक वन राण्यांचा होता तो अर्थार्जनचा प्रवास



**मनिषा छत्रे**
**manisha.chhatre@gmail.com**

# बहावा

पिवळे पिवळे सुरेख झुंबर, कोण बांधतो या झाडावर
रोज सकाळी कांचन कुसुमे, कुठून येती या शाखांवर



सडा शिंपिते उषा प्रभाती, सोनघडा घेवुनिया हाती
रंगवतो बघ अमलताश हा, देहावर ती हेमल कांती

जशी नववधू दिसे गोजिरी, मुंडावळ बांधून कपाळी
तशीच भासे सोनतरूची, हळदुली जणू मुग्ध डहाळी

फुले उन्हाची लेवुन अंगी, कटि पीतांबर कधी नेसुनी
स्वागत करण्या मधुमासाचे, उभा ठाकतो जरा झुकूनी

वसंत वैभव सर्वांगावर, राजवृक्ष हा असे मिरवतो
नयनरम्य हे रूप मनोहर, पहाता मनी हर्ष दाटतो



**वर्षा पेठे**

**vnpethe@gmail.com**

The Butterfly life cycle!

5 Adult Butterfly

1 Eggs

2 Caterpillar (larva)

3 chrysalis

4 pupa

कु. अनन्या शिंदे

इ. २ री



